# जगाचे प्रवासी

भाग १ ला

लेखक

प्रो. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

श्री लेखन वाचन भांडार,
लक्ष्मी रोड, पुणें २.

आवृत्ति पहिली १९५१

किंमत सव्वा रुपया

# आरंभीचे दोन शब्द

मार्को पोलो, कोलंबस, आणि कॅप्टन कुक् या तीन साहसी लोकांनीं केलेल्या प्रवासाचीं आणि सफरींचीं वर्णनें या छोट्याशा पुस्तकांत दिलीं आहेत. हीं वर्णनें करताना त्यांचीं चरित्रेंही त्यातच सहजासहजी येऊन गेली आहेत. सृष्टिकर्त्याने निर्माण केलेली ही पृथ्वी आहे तरी कसली आणि या पृथ्वीच्या पाठीवर माणसाच्या जातीने उत्पन्न केलेली किमया तरी कसली आहे हे पाहण्याची इच्छा या लोकांना झालेली होती; आणि ती इतकी प्रबल होती कीं, संकटांचे पर्वत जरी त्यांच्या मार्गांत उभे राहिले तरी ती भागवण्यासाठी त्यांनीं सर्व तऱ्हेचीं साहसे केलीं. आधुनिक काळांत प्रवासाचीं साधनें अत्यंत सुलभ झालेलीं आहेत आणि तरीही आपल्यापैकी फारच थोडे लोक पृथ्वीचे स्वरूप पाहण्यासाठीं घराच्या बाहेर पडतात. हजार–पाचशे वर्षांपूर्वी प्रवासाचें मुख्य साधन म्हणजे स्वतःचे पाय, घोडी, उंट, आणि हा प्रवास समुद्राचा असला तर ज्याना होडगी हेंच नांव शोभेल अशी तराडी, येवढेंच होतें. अशा काळीं मार्को पोलो, कोलंबस आणि कुक् यांनीं केवळ जिज्ञासा म्हणून केलेलीं पर्यटनें पाहिलीं म्हणजे जीव थक्क होऊन जातो. याच्या या पर्यटनांमुळेंच पृथ्वीचा व्याप माणसांच्या ध्यानीं आला; आणि निरनिराळ्या प्रदेशातील माणसांनीं उत्पन्न केलेल्या विविध संस्कृति परस्परांच्या ओळखीच्या झाल्या. या प्रवासाचीं वर्णनें विद्यार्थ्यांना मनोरंजक वाटतील व ती वाचलीं असताना त्यांच्या ज्ञानांत भरही पडेल, असा बळकट भरंवसा वाटतो.

मार्कों पोलोच्या प्रवासाची हकीकत त्याच्या मूळ पुस्तकावरूनच दिली आहे. हें मूळ पुस्तक फार मोठें असून तें बारीक सारीक तपशिलानें तुडुंब

भरलेलें आहे. विद्यार्थ्यांनीं मोठेपणीं तें वाचावें. पण प्रस्तुतच्या पुस्तकांतील वर्णनानें त्यांना मार्को पोलोच्या प्रवासाची आणि त्यांच्या चरित्राची पुरेशी माहिती होईल. मीं मागें एकदां कोलंबसाचें चरित्र लिहिलें होतें. पण तें जसेच्या तसें या पुस्तकात घेतलेलें नाही. वृत्तान्त तोच असल्यामुळें दोन्ही सारखींच वाटावी हें स्वाभाविक आहे. पण एकदोन परिच्छेद सोडले तर, या पुस्तकांतील चरित्र भाषारूपानें तरी अगदीं निराळें आहे असें वाटेल. शिवाय, कोलंबसाच्या मूळ हेतूची सांगता कितपत झाली याचें थोडेसें स्वतंत्र विवेचनही या चरित्रांत केलेलें आहे. कॅप्टन कुक् यानें स्वतःच आपल्या तीन सफरींची हकीकत लिहून ठेवली आहे. त्यानें केलेलीं समुद्राचीं, बेटाचीं आणि निरनिराळ्या जमातींच्या जीवितांची वर्णनें तपशिलानें भरलेली आहेत. कित्येकदां हा तपशील सारखा सारखाच वाटतो; कारण या जमाती निरनिराळ्या बेटांत राहात असल्या तरी सगळ्यांचें मानवी मन एकच होतें. एकादी चित्रशाळा पहावयास आलेल्या माणसांनीं जर विशेष जिज्ञासा दाखविली आणि चित्रांचीं बारीकसारीक सौंदर्येंसुद्धां मार्मिकपणानें पाहिलीं तर चित्रकारांना अतिशय आनंद होतो. आपल्या कृतीची विविधता आणि तिची सौंदर्यें हीं इतक्या साहसानें आणि रसिकतेनें पहाणाऱ्या कुक्च्या जिज्ञासेकडे पाहूनही सृष्टिकर्त्याला खरोखर आनंद झाला असेल. त्याच्या आधीं परमेश्वराच्या कृतींचें इतकें सूक्ष्म अवलोकन कोणीही केलेलें नव्हतें. असो.

या तिघांच्याही साहसवृत्तीमुळें आणि जिज्ञासेच्या वापरामुळें पृथ्वीचा आणि मानवी जीविताचा व्याप तेव्हांच्या माणसांना खरोखरच स्पष्ट होऊं चुकला आणि आपल्या जीविताची प्रगति सुलभ झाली. हीं चरित्रें विद्यार्थ्यांनीं चांगलीं मन लावून वाचावीं.

आरंभीचे दोन शब्द

या सर्वांच्या प्रवासाचे नकाशे ठिकठिकाणीं दिले आहेत. ते मूळ मुक्कामाशीं वेळोवेळीं ताडून पाहिल्यानें त्याच्या पराक्रमाचे रहस्य विद्यार्थ्यांच्या ध्यानांत येईल; या वर्णनांत आलेला गमतीचा तपशील त्यांनीं मनांत सांठवून ठेवला तर, त्याना आपलें संभाषण मनोरंजक करता येईल; आणि प्रत्येक देखाव्याबरोबर त्यांच्या मनाचा व्यापकपणाही वाढत जाईल.

माझे मित्र श्री. गजाननराव ठोकळ यांनीं अशा प्रकारचीं पुस्तकें प्रसिद्ध करण्याचें काम अंगावर घेतल्यामुळें माझा फायदा असा झाला कीं, मूळ पुस्तकें मला बारकाईनें वाचावीं लागली; आणि विद्यार्थ्यांचा फायदा असा होईल कीं, या वयांतच त्यांना मानवी साहस आणि जिज्ञासा यांची ओळख बरोबर होईल.

पुणें
ता. ४–६–१९५१ } श्रीपाद महादेव माटे



# मार्को पोलो

**मार्को पोलो या व्हेनिस शहरच्या प्रवाशाची ओळख विद्यार्थ्यांना फार मौजेची वाटेल. व्हेनिसपासून चीनच्या राजधानीपर्यंत, तेथून जावा सुमात्रावरून हिंदुस्थानपर्यंत, व तेथून परत व्हेनिसकडे त्यानें प्रवास केला होता व पेकिंग नगरांत तो सतरा वर्षें राहिला होता. प्रथम त्याचें लहानसें चरित्र देतों व मग त्यानें दिलेल्या प्रवास वर्णनांतील कांहीं चुटके देतों.**

मार्को पोलोच्याही पूर्वी पोप महाराजानीं रुब्रोकी या नावाचा आपला एक वकील चीनच्या दरबारात पाठवलेला होता. त्याने केलेले चीन देशाचे वर्णन फारच बोधप्रद आहे. तो म्हणतो, " आपण या देशाविषयी भलत्याच काहीतरी कल्पना करून घेतल्या आहेत. माझा अनुभव असा आहे कीं, सामाजिक व्यवहारांत आणि चालचलणुकीत हे लोक फारच सभ्य, सुसंस्कृत, आणि आदरयुक्त सलगीने वागणारे आहेत. आपल्या युरोपांत जिकडे तिकडे भांडणें, मारामाऱ्या, केशाकेशी आणि रक्तपात हींच नेहमी चालू असतात. पण त्यांच्या देशांत पहावें तो लोक दारू पिऊन झिंगलेले री असले, तरी भांडणतंट्यांचा मागमूसही तेथें दिसत नाहीं. कोठेंही जा,

लोक सचोटीनें वागत आहेत, असें दिसून येईल. त्याना घराला कुलपें लावावीं लागत नाहीत; किंवा दारावर पहारेकरीही ठेवावे लागत नाहींत. त्याचीं गुरें ढोरें जर चुकून भलतीकडेच कोठें गेलीं, तर तीं परत मिळ-ण्याची व्यवस्थाही चांगली केलेली असते. देशांत धान्याचा दुष्काळ पुष्कळदा पडतो. परंतु लोक येवढे उदार आहेत कीं, आपल्या शेरांतले पसाभर धान्य तरी, ते भुकेल्या माणसाला दिल्याशिवाय राहाणार नाहींत.'' मार्को पोलोच्या मतावरून सुद्धां असें दिसतें कीं, हे लोक मोठे साहिष्णु असावेत. सर्व आशियातच कोठें कोठें ज्यू लोकांची आणि ख्रिस्त्याचीही वस्ती होती. परंतु आपापल्या धर्माप्रमाणे वागावयास त्यांना पूर्ण मोकळीक असे, आणि त्यांच्या देवस्थानावर तेथें कसलेही कर बसवित नसत.

मार्को पोलो तेथे यावयाच्या आधींच, स्थापत्याची दोन प्रचंड कामें या लोकांनीं करून टाकलेलीं होतीं. चीन देशाची सुप्रसिद्ध विस्तीर्ण भिंत; आणि पेकिंग पासून कॅन्टीनपर्यंत वहात चाललेला प्रचंड कालवा, हीं तीं दोन कामें होत. या कालव्याचे शेवटचे सहाशे मैल कुब्लाई खानाच्या कारकीर्दींत पुरे झाले. नवलाची गोष्ट ही कीं, इतकीं वर्षे झालीं तरी, ही भिंत आणि हा कालवा अजूनही जशींच्या तशीं मजबूत आहेत; आणि दुसरे म्हणजे येवढी विस्तीर्ण भिंत, अजून दुसऱ्या कोणी बांधली नाहीं व येवढा लांब कालवाही कोणी खणला नाही. टपालाची व्यवस्थाही या देशात तेव्हा झालेली होती. चिनी लोकाची कलाकुसर तर, मार्को पोलो तेथें जावयाच्या आधींही कित्येक सहस्त्र वर्षे प्रसिद्धी पावलेली होती. चित्रकला, खोदकाम, पुतळ्यांचें ओतकाम, चिनी मातीचीं भांडीं करणे, आणि भव्य इमारती बांधणें, या कामांत चिनी लोक पटाईत होते. वाङ्मयाचा विकासही पुष्कळच झालेला होता. इ. स. १०५ च्या सुमारासच चिनी लोकांना कागदाचा शोध लावला होता; आणि ९३२ त चिनी भाषेंत छापलेलें

पुस्तक आजही पाहावयास सांपडतें. इ. स. सुमारे १००० च्या सुमारास, चिनी लोकांनीं विश्वकोश रचला. याच्या सहस्त्र शाखा असून, याच्या छपाईचें काम प्रत्यक्ष बादशहाच्या देखरेखीखालीं झालेलें होतें. अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, धर्म, युद्धकला, शेतकी, चित्रकला, संगीत अशासारख्या विषयावर पुस्तकेंही छापून झालीं होतीं. सध्यांच्या छापावयाच्या खिळ्यासारखे भाजलेल्या मातीचे ठसे असत व ते १०४३ च्या सुमारासच प्रचारांतही आलेले होते; आणि कागदाच्या चलनी नोटा सर्व साम्राज्यभर सरसहा चालू असत. नद्यांच्या पुलांवर पाण्याच्या दाबानें चालणारीं घड्याळें बसविलेलीं होतीं. वेधशाळात ग्रहाच्या गति मोजण्याचें काम चालू होतें. निरनिराळ्या धातूंच्या आणि कोळशांच्या खाणी खणीत असत, आणि समुद्रांतून मीठही काढीत.

१२६० सालीं, निकोलो पोलो, आणि माफिओ पोलो, असें दोघे बंधु बरोबर हरतऱ्हेचा किमतवान् माल घेऊन, जहाजावरून कॉनस्टँटिनोपलकडे निघाले. इटलींतील व्हेनिस शहरचे हे रहिवासी मोठे संभावित आणि माहितगार होते. कॉन्स्टँटिनोपल येथे गेल्यावर त्यांना वाटूं लागलें कीं, आपण काळया समुद्रांत जावें, आणि व्यापार करावा. बरोबर जडजवाहिराचा पुष्कळ माल घेऊन, ते या समुद्रांत गेले, आणि पूर्व किनाऱ्यावरील बंदरांत उतरून, तार्तरी लोकांच्या मुलुखांत शिरले. बर्को या नांवाचा त्यांचा एक अतिशय संपन्न आणि प्रबल राजा होता. तो मनानेंही मोठा उदार आणि सुसंस्कृत होता. पोलो बंधु त्याच्या दरबारात गेले, आणि त्यांनीं त्याला चांगलीं चांगलीं रत्नें नजर केलीं. औदार्यांत आपण मागें पडतां कामा नये असें वाटून बर्कोनें दुप्पट किमतीचीं रत्नें त्यांनाही नजर केलीं. पोलो बंधु तेथें वर्षभर राहिले; आणि घरीं परत जाण्याचें त्यांनीं ठरविलें. परंतु परतीच्या मुलुखांत, युद्धाचा धिंगाणा फार माजला आहे असें वर्त-

मान आल्यामुळे, तसेच पूर्वेकडे जावे, आणि तार्तरी मुलुखाला वळसा घालून, दक्षिणेकडे वळून, कॉन्स्टॅन्टिनोपलला जावे असे त्यानीं ठरविले. व्होल्गा नदी ओलांडून ते पुढे गेले; आणि मग त्याना एक निर्जन प्रदेश लागला. सतरा दिवसपर्यंत ते या प्रदेशातून रखडत गेले; आणि शेवटी बुखारा शहराला पोहोंचले.

ते बुखारा येथे असतांना, एक मोठा बुद्धिमान् आणि खानदानीचा माणूस त्या शहरांत आला. हा कुब्लाईखानाकडे आपल्या देशाचा वकील म्हणून चाललेला होता. इटली देशातील दोन व्यापारी येथे आले आहेत असें कळल्या-वरून, केवळ जिज्ञासा म्हणून तो त्यांना भेटावयास गेला. आतापर्यंत पोलो बन्धु तार्तरी भाषा चागली बोलूं लागले होते. या तिघाची मोठी मैत्री जमली. तेव्हा तो त्या पोलोना म्हणाला, "तुम्ही माझ्या बरोबर कुब्लाईखानाच्या राजधानीला चला. तुम्हाला पाहून खानाला अतिशय आनंद होईल. तेथे तुमचा मान मरातब होईल; आणि पैकाही पुष्कळ मिळेल." आडवाटेने कॉन्स्टॅंटिनोपलला जाण्याऐवजीं तार्तरी मुलुखांतील युद्ध संपेतोंपर्यंत, आपण खानाच्या मुलुखात जाऊन यावें असा हिशेब करून, हे पोलो बन्धु वकिला-बरोबर निघाले. राजधानीत पोहोचावयास त्याना तब्बल वर्ष लागले.

पोलो बंधु जेव्हा कुब्लाईच्या राजसभेत आले, तेव्हा त्या खानाचे वय ५९ वर्षांचे होतें. त्याचे तरुणपण झगडण्यात गेले होते व मध्यम वय मुलूखगिरीच्या मोठमोठाल्या योजनांत गेलें होतें. चीन देशाच्या स्वारींतील एका वेढ्यात त्याचा भाऊ मरण पावल्या-नंतर, कुब्लाईखानानें आपल्या नावाची द्वाही फिरवली. यावेळी तो सुमारे ४४ वर्षांचा होता. सैन्याची जमवाजमव करून, तो चीन देशावर चालून गेला; आणि त्या देशातील एका शहरांत त्यानें आपली राजधानीच कायम केली. सध्यांचे जें पेकिंग शहर आहे तें तेंच होय. पोलो बंधु या राज-

धानींत आले, तेव्हां या नगरीचें वैभव अगदीं कळसाला पोचलें होतें. चीन देशाच्या सुंग राजवंशाशीं पन्नास वर्षेपर्यंत मोगल लोकांची मारामारी चाललेली होती. शेवटीं हें घराणें बुडाले, आणि मोगल लोक पूर्वेकडील प्रदेशाचे स्वामी झाले. ते स्वामी झाले खरे पण, तेव्हांपासूनच त्यांच्या ऱ्हासाला सुरुवात झाली. चीनसंबंधानें अशी एक म्हण आहे कीं, ‘ हा देश म्हणजे एक खारा महासागर आहे; आणि याला येऊन मिळणाऱ्या साऱ्या नद्या खाऱ्याच होऊन जातात. ’ मोगल लोक या देशांत वस्ती करूं लागतांच, त्याचे गुण मावळूं लागले. देशांत असंतोष आणि बंडाळी हीं सुरूं झाली. वास्तविक पाहता हें साम्राज्य चिनी समुद्रापासून पश्चिमेकडे युरोपपर्यंत, आणि शीतकटिबंधापासून, तो दक्षिणेकडे हिंदुस्थान, ब्रह्मदेश आणि सयाम येथपर्यंत पसरलेलें होतें. पण हें आवाढव्य साम्राज्य, मोगल लोकांचे वैभव शिखराला पोचतें न पोचते तोंच, मोडकळीला आले. मात्र कुब्लाईखान याच्या डोक्यांत अजूनही नवे प्रदेश जिंकण्याची कल्पना घोळतच होती.

पण हा कुब्लाईखान तरी येवढ्या अफाट साम्राज्याचा स्वामी कसा झाला, हें कळावयास हवें असलें तर, त्याच्या मोंगल वंशाची कुळकथा नीट पाहिली पाहिजे. कुब्लाईचा आजा हा ११६२ त जन्मला. त्याचा बाप एका मंगोलियन जमातीचा नाईक होता. कुब्लाईखानानें जें साम्राज्य भोगलें, ते त्याच्या या आजानें मिळविलेले होतें. त्याचे नांव जैंगिझखान असे होतें. सबंध आशिया खंड जिंकून त्याच्या फौजा युरोपांतील नीपर नदीच्या वाळवंटांत विश्रान्तीसाठीं हुश्श करून बसल्या होत्या. तेरा वर्षांचा असतांना हा जैंगिझखान आपल्या जमातीचा नाईक बनला; आणि त्यानें एकदमच स्वारी शिकारीला सुरवात केली. या पोराचें कोण ऐकतों, अशा हिशेबानें कित्येक तातरी जमातींनीं बंडाळी माजविली. जैंगिझखानाची आईही

बडी शूर बाई होती. मायलेकांनीं बळ बांधलें; आणि या बंडखोर जमातींचीं चागलीं हाडें मोडलीं. चव्वेचाळीस वर्षांचा झाल्यावर, त्याला वाटूं लागलें कीं, सम्राट् ही पदवी घेण्याला आतां हरकत नाहीं. सम्राट्-पदाचा अभिषेक झाल्यावर त्यानें उत्तर चीनवर स्वारी केली. त्या देशाच्या भिंतीतील वेशीवरील पाहरेकऱ्यांना त्याने पैसे चारले, आणि तो आंत घुसला, व त्याने आपले साम्राज्य प्रस्थापित केलें.

इ. स. १२२२ त पश्चिमेकडे चाल करून गेलेलें मोंगल सैन्य जॉर्जिया देशांत शिरले. जेंगिझनें आपलें कांहीं वकील रशियांतही पाठवले. वेड्या रशियनांनीं या लोकाचे खून केले. आणि मग सूडाच्या बुद्धीनें वेडे झालेले जेंगिझखानाचे लोक साऱ्या मुलखाचा विध्वंस करीत एकीकडे बल्गेरियापर्यंत पोंचले व दुसरीकडे पोलंडपर्यंत गेले. याचा अर्थ असा कीं, जेंगिझखानाचें साम्राज्य पूर्वेकडे चिनी समुद्रापासून तो पश्चिमेकडे पोलंडपर्यंत पसरलें. खान लवकरच मृत्यू पावला; आणि मोंगल लोकांची लाट आशियाकडे परत फिरली. यावेळीं पोपच्या धर्मपीठातील कांहीं महन्त मोंगल मुलुखांत गेले, आणि त्यांना सांगूं लागले कीं, " तुम्हांला पश्चाताप होऊं द्या. तुम्हीं ख्रिस्ती लोकाना मारलेलें आहे. तुम्हीं अतःपर परमेश्वराच्या या लोकांना सतावूं नका." १२५३ त पोपच्या मठांतून आणखी कांहीं महन्त तिकडे गेले. मोगल सम्राटाला ख्रिस्ती बनवावें, असा त्यांचा मानस होता; यावेळीं जेंगिझखानाचा नातू म्हणजे कुब्लाईखानाचा मोठा भाऊ गादीवर होता. त्यानें या महन्तांना उत्तर केलें कीं, 'परमेश्वर एक आहे असें म्हणणारे लोक महामूर्ख आहेत; अनेक आहेत असें समजणारें लोक मात्र खरेखरे शहाणे होत;' तो येवढ्यावरच थांबला नाहीं. त्यानें पश्चिमेकडील देशांची चवकशी केली; आणि मग तो या महन्तांना म्हणाला, 'तुमचे देश जर येवढे संपन्न आहेत तर ते आम्हाला लुटलेच पाहिजेत." पण असें बोल-

पारा हा मंगु नांवाचा सम्राट् १२५९ त मरण पावला; आणि त्याचा धाकटा भाऊ कुब्लाई हा गादीवर आला.

या कुब्लाईखानाला मोंगल वंशाचा पूर्वज समजतात. कारण, चीन देशाच्या सुंग राजघराण्याचें पुरतें निसंतान यानेंच केलें. पण खरी गोष्ट अशी आहे कीं एकीकडे याचा पराक्रम शिगेला पोंचत असतांना, दुसरीकडे त्याच्या साम्राज्यांत अनेक अनर्थ–परंपरा सुरू झाल्या. उत्तरेकडील रानटी जमाती बंडें करून उठल्या; सैन्यांत दुफळी उत्पन्न झाली; अंमलाखालीं आणलेल्या निरनिराळ्या लोकात असंतोष फैलावला; आणि जपानी समुद्रांत सुरू केलेल्या लढ्यात त्याचे अनेक पराभव झाले. कुब्लाईखानाच्या हें ध्यानांत आलें कीं, एकदर लक्षण काहीं ठीक नाहीं; आणि जर साम्राज्य सावरूनच धरावयाचें असेल, तर शिक्षणाचाच प्रसार करावयास हवा; आणि मग शिक्षणाच्या मागोमाग देशांत शांतताही प्रस्थापित होईल.

वर सांगितलेल्या त्या प्रवाशांना सेवकांनीं कुब्लाईखानाच्या समोर नेऊन उभें केलें. खान मोठा प्रेमळ आणि विनयशील माणूस होता. लॅटिन देशांतील असलीं माणसें त्यानें पूर्वी कधीं पाहिलीं नव्हतीं. त्यांना पाहून कुब्लाईला फारच आनंद झाला. त्यानें त्यांच मनापासून स्वागत केलें, आणि आपल्या दर्जाला शोभेल, अशी त्यांची बडदास्त ठेवली. विश्रान्तींत कांहीं दिवस जाऊं दिल्यावर कुब्लाईनें त्यांची विचारपूस केली; आणि मग, उभयतांचा संवाद सुरू झाला. रोमन सम्राट कोण आहे, त्याचें राज्य केवढें आहे, त्यांचा धर्म कोणचा आहे, त्यांच्या देशांत न्यायाच्या पद्धति कोणच्या आहेत, त्यांची युद्धनीति कसली आहे, याची त्यानें चौकशी केली; आणि मुख्य म्हणजे पोपचा अधिकार काय, धर्मपीठाचा अधिकार कसा चालतो, आणि ख्रिस्ती धर्माचीं तत्वें कोणचीं, याचीही चौकशी त्यानें केली. यावेळेपर्यंत हे रोमन प्रवासी तार्तरी भाषा चांगले बोलू

लागले होते आणि ते चांगले माहीतगारही झाले होते. कुब्लाईनें विचारलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरें त्यानी अशा रीतीनें दिलीं की, कुब्लाई अगदीं संतुष्ट होऊन गेला. प्रवाशांच्या संबधानें त्याला फार आदर उत्पन्न झाला. मग एके दिवशीं तो त्याना म्हणाला, ‘ आपण फार थोर गृहस्थ आहा; आम्ही आमचा एक सरदार आपल्या बरोबर देतो. त्याला घेऊन आपण आपल्या देशांत जावें व पोप महाराजांची व त्याची भेट करवावी. पोप महाराजांना आमची विनंति येवढीच आहे की, ख्रिस्ती धर्माची मूलतत्वे, वक्तृत्व, न्यायशास्त्र, व्याकरण, गणित, ज्योतिष, संगीत, आणि भूमिति, या कलांत आणि शास्त्रात प्रवीण असलेले शंभर पंडीत त्यांनीं आमच्याकडे धाडावे. हे पंडित चागले वादकुशल असावेत. त्यांनीं आमच्या विद्वानांना सरळपणे पटवून द्यावें कीं, ख्रिस्ती धर्म हा दुसऱ्या कोणत्याही धर्मापेक्षा श्रेष्ठ आहे; आणि ज्या सत्यावर तो आधारलेला आहे, तें सत्य जगाला इतर सत्यापेक्षा जवळचे वाटण्यासारखे आहे. तार्तरी लोकाचे जे देव आहेत, आणि ज्यांच्या मूर्ति त्यांनीं आपल्या घरात बसविलेल्या असतात, ते सारे देव नसून भुतेखेते आहेत; आणि एकंदर प्राची दिशेकडील लोक अशा देवताना भजण्यात मोठा प्रमाद करीत आहेत, असे त्यांनी पटवून द्यावे.’ याशिवाय, कुब्लाईने या प्रवाशाना आणखीही एक काम सागितलें. तो म्हणाला, ‘ येशू ख्रिस्ताला मी अतिशय मानतो आणि त्याला खरा देव समजतों, म्हणून, आपल्या देशीं जाऊन तुम्ही जेव्हां परत इकडे याल, तेव्हा येतांना, येशूच्या समाधीपाशीं तेवत असलेल्या नंदादीपांतील थोडेसें तेलही इकडे घेऊन या. ’ कुब्लाईखानाचें हे बोलणें ऐकून, प्रवाशांनीं त्याच्यापुढें दंडवत घातलें; आणि ते म्हणाले कीं, आपण सांगितलेलीं सर्व कामें आम्हीं चांगलीं झटून करूं. हें ऐकतांच कुब्लाईखानानें तार्तरी भाषेंत पोपच्या नांवाचीं पत्रें लिहविलीं, आणि तीं त्यांच्या

हवाली केली. आणि आपल्या सहीशिक्याचे प्रवास-परवानेही त्यानें या प्रवाशाना दिले. हे जवळ असले म्हणजे प्रवाशाची सर्व तऱ्हेची सोय होत असे. प्रत्येक मुक्कामाचे अधिकारी, परवाना पाहिल्याबरोबर प्रवाशांची विचारपूस करीत, त्यांना शिधासामग्री देत, आणि त्यांच्या सुखसोयींकडे पहात.

परवाने घेऊन हे दोघे पोलो बंधु स्वदेशाकडे परत वळले. कुब्लाई-खानानें नेमलेला वकील खोगातल हा अर्थातच त्यांच्या बरोबर होता. वीस दिवस वाट चाल होते न होते, तोंच खोगातल आजारी पडला; इतका की, तो जगतो कीं मरतो, असे झाले. शेवटीं तो म्हणाला कीं, माझ्याच्यानें पुढें येववत नाहीं. बरीच भवति न भवति होऊन पोलो बंधूंनीं त्याचा निरोप घेतला, आणि ते आपल्या मार्गाला लागले. खानाचे परवानेच बरोबर असल्यामुळे गावोगावच्या अधिकाऱ्यांनीं त्यांची चांगली व्यवस्था ठेवली; वाटखर्चाला त्याना पैसे दिले; आणि प्रसंगविशेषीं वाट दाखविण्यासाठीं बरोबर माणसेंही दिलीं. इतकी सोय होऊनही या पोलोंचा परतीचा प्रवास अतिशय जिकीरीचा झाला. येता येता, तीन वर्षांनंतर ते आर्मिनियांत येऊन पोहोंचले. १२६९ च्या एप्रिल महिन्यांत, ते एकर येथें आले, तो त्याना कळलें कीं, पोप चवथा क्लेमंट हा मरण पावला आहे. गांवच्या धर्माधिकाऱ्यांकडे हे दोघे गेले, आणि कुब्लाइखानानें सांगितलेल्या निरोपाचें आतां काय करावें, असें त्यांनीं त्याला विचारलें. तो म्हणाला, 'नव्या पेपची निवडणूक लवकरच होईल. तोंपर्यंत तुम्हीं थांबा, आणि मग रोमला जा.' हा सल्ला पोलो बंधूंना पटला; आणि दरम्यानच्या काळांत, आपल्या घरीं एकदा जाऊन यावें, असें त्यांनीं ठरविलें. घरीं आल्यावर, त्यांना एक नवाच प्रकार दिसून आला. निकोलो पोलोची बायको मरण पावली होती. तो चीन देशाकडे निघाला

तेव्हां त्याची ती पत्नी गरोदर होती. त्याच्या पश्चात् ती प्रसूत होऊन तिला मार्को नांवाचा मुलगा झाला होता. आणि तो आतां पंधरा वर्षांचा होता. हाच मार्को पुढें मार्को पोलो या नांवानें प्रसिद्ध झाला.

नव्या पोपची निवडणूक लांबतच चालली. दोन वर्षें ते व्हॅनिस येथे राहिले. परंतु महाराजांच्या निवडणुकीचा योगच येईना. शेवटी, कुब्लाई-खान आपल्याला दोष देईल, यांनी आपला निरोप नेलाच नाहीं, असें म्हणेल असें वाटून, ते दोघे चीन देशाकडे जावयास पुन्हा निघाले. जातांना त्यांनीं मार्कोला बरोबर घेतलें. येशू ख्रिस्ताच्या नंदादीपांतील तेल बरोबर न्यावयाचें होतें, म्हणून ते जेरुशलेमला आले आणि तेल घेऊन, तडक पूर्व दिशेला निघाले. दरम्यान इकडे नव्या पोपची निवड झाली. याचें नांव दहावा ग्रेगरी असें होते. पोलो बंधूंनीं आणलेला कुब्लाई-खानाचा निरोप त्याच्या कानावर आलेला होता. परंतु, हे बंधु, निवडणूक होत नाहीं असें पाहून, आचार्य–पीठांत निरोप न पोहोंचवितांच परत गेलेले आहेत, असेंही त्यानें ऐकलें. म्हणून त्यानें आपले दोन दूत त्वरेने पोलो बंधूंच्याकडे पिटाळले, आणि त्यांना परत रोमला आणविलें. ग्रेगरीने त्यांचें चांगलें स्वागत केलें; आणि निकोलस आणि विल्यम् असे दोन महन्त त्यानें पोलोंच्या बरोबर दिले. कुब्लाईखानासाठीं, त्यानें कांहीं स्फटिकाची भांडीं दिलीं; आणि तिघांचा प्रवास सुखानें व्हावा म्हणून गांवोगांवच्या मठपतींना आज्ञापत्रें दिलीं. तिघे पोलो, आणि हे दोघे महन्त असे पांच लोक कुब्लाईखानाकडे जावयास निघाले.

आर्मेनियापर्यंत पोहोंचतांच, वर्तमान आलें कीं, बाबिलोनच्या राजानें आर्मेनियावर स्वारी केलेली आहे; आणि तो सारा मुलूख बेचिराख करीत चालला आहे. हें वर्तमान ऐकतांच ते दोघे महन्त अगदीं गडबडून गेले. पोलोंनीं त्यांना परोपरीनें समजावून सांगितलें, पण ते म्हणाले, ‘ आम्हांला

दम निघत नाहीं.' महाराजांनीं कुब्लाईखानाला दिलेलीं पत्रें आणि स्फटिकाचीं पात्रें त्यांनीं पोलोंच्या स्वाधीन केलीं आणि आपण घराकडे परत वळले. पोलो मंडळी मात्र, कसलीही दरद न बाळगतां, पूर्वेच्या रोखानें चालूं लागली. तीन वर्षं प्रवास केल्यानंतर, त्याना वर्तमान कळलें कीं, कुब्लाईखान शांगटु शहरीं आहे. खानालाही कळलें कीं, ते ख्रिस्ती प्रवासी परत आले आहेत. अजून ते बरेच लांब होते, म्हणून खानानें आपलीं माणसें त्यांना भेटावयास धाडलीं. थंडीची बाधा होऊं नये म्हणून, त्यानें त्यांच्या वस्त्रप्रावरणाचीही व्यवस्था केली. होतां होतां कुब्लाईखानाच्या दरबारांत ही मंडळीं एकदाची येऊन पोहोचली.



राजसभा भरल्यावर हे तिघे पाहुणे मोठ्या नम्र भावनेनें सभा-मंदिरांत शिरले; आणि त्यांनीं कुब्लाईला साष्टांग प्राणिपात केला. पोलोंनीं झालेली

सर्व हकीकत खानाला सांगितली, आणि प्रवासाचे , वर्तमानही अनुक्रमानें कथन केलें. ग्रेगरीनें पाठवलेली पात्रे आणि जेरुसलेमहून पोलोंनीं आणलेलें नंदादीपांतील तेल, हीं पाहून राजा अगदीं खूष होऊन गेला. मार्कोकडे वळून तो म्हणाला, ' हा कोण ?' निकोलोने उत्तर केलें, ' हा आपला सेवक—माझा मुलगा आहे.' अठरा वर्षांचा मार्को यावेळीं अतिशय तरतरीत दिसत होता. खानाने त्याला आपल्या परिचारकामध्येंच दाखल करून घेतले; आणि पोलो बंधूंना मानकऱ्यांच्या जागा देऊन त्यानें त्यांचा बहुमान केला. तथापि, मार्कोवर त्याची मर्जी फारच बसली, आणि दरबारांतील लोकही त्याला चाहूं लागले.

मार्को अतिशय बुद्धिमान् होता. थोड्याच दिवसांत चार निरनिराळ्या भाषा तो बोलूं लागला. ही त्याची चलाखी पाहून, खानानें त्याच्या गुणांचा उपयोग करून घ्यावयाचे ठरवलें. काराझान हें एक फार दूरचे शहर होतें. तेथें कांहीं सरकारी काम निघालेले होते. राजाने ही कामगिरी मार्कोवर सोपविली. सहा महिने प्रवास केल्यावर मार्को तेथे पोहोचला ! त्याने आपलें सांगितलेले काम फार शहाणपणाने आणि मागचा पुढचा विचार करून तडीस नेले, आणि तो कुब्लाईखानाकडे परत आला. काम फत्ते झाल्यामुळे खान खूष झालाच पण शिवाय, मार्कोनें केलेले प्रवासाचें वर्णन ऐकून, त्याची मोठीच करमणूक झाली; आणि निरनिराळ्या प्रदेशांतील लोकांच्या चालीरितींची माहिती टिपून घेण्याची मार्कोची आस्था पाहून त्याला त्याच्याविषयी फारच आपुलकी उत्पन्न झाली. सतरा वर्षेपर्यंत मार्को कुब्लाईखानाच्या पदरीं राहिला. आपल्या अफाट साम्राज्यांतील दूरदूरच्या ठिकाणीं सुद्धां कांहीं महत्वाचीं आणि नाजूक कामें उत्पन्न झालीं, तर कुब्लाईनें मार्कोला धाडावें, असें ठरून गेलें. मार्को साम्राज्याच्या चारही दिशांना हिंडला आणि या भ्रमन्तीत

त्याला जे स्थलविशेष दिसले, त्याने ज्या चालीरीती पाहिल्या, त्या सार्‍या त्याने आपल्या टिपणवहींत नोंदून ठेवल्या. सतरा वर्षे गेल्यावर, पोलो मंडळींना वाटले कीं, आता आपल्या देशाला परत जावे. आतापर्यंत त्यांनीं पुष्कळ जडजवाहीर आणि सोने नाणे कमावलेले होते. तें बरोबर घेऊन घरी जावे असे त्यांना वाटूं लागले. दुसराही एक विचार त्यांच्या मनाला चाटून गेला. खान आता म्हातारा होऊं लागला होता. तो जिवंत आहे तोंच आपल्या परतीच्या प्रवासाची सोय होईल, हे हीं त्यांना माहीत होतें; म्हणून त्यांनीं घरीं जाण्याचा निश्चय कायम केला. एके दिवशीं बोलतां बोलतां, ते राजाच्या पायां पडले आणि आपला मनोदय त्यांनीं त्याला कळविला. राजा म्हणाला, ‘ तुम्हीं हे काय मनांत आणले आहे ? हवेच असले तर, सध्याच्या दुप्पट धन मी तुम्हाला मी देईन. पण तुम्ही येथून जाऊं नका. ’ पण पोलोंना घराची ओढ लागलेली होती. आणि याच वेळीं दुसरा एक अकल्पित प्रकार घडून आला.

हिंदुस्थानचा (?) राजा अरगॉन याची राणी बोल्गाना ही याच सुमारास मरण पावली. मरताना तिने नवऱ्याला सांगितले की, तुम्हांला पुन्हां लग्न करावयाचे तर करा. पण नवरी मुलगी मात्र मी ज्या कुळांतील आहें, त्याच कुळांतून तुम्हीं निवडली पाहिजे. दुसऱ्या कोठच्याही मुलीला तुमच्या मनोमंदिरात आणि सिंहासनावर स्थान मिळता उपयोगाचें नाही. माझ्या माहेरचे कुळ चीन देशात आहे; आणि तेथे कुब्लाईखानाचे राज्य आहे. राजाला अर्थातच लग्न करावयाचे होते ! मात्र राणीच्या मनाप्रमाणे वागावयाचें त्याने ठरविले. मग आपल्या दरबारांतील तीन चांगले शहाणे मानकरी, मोठा लवाजमा बरोबर देऊन, त्याने कुब्लाईखानाकडे धाडले; आणि त्याला विनंतिपत्र लिहिले की, आमच्या दिवंगत पत्नीच्या माहेरच्या कुळांतील एक नवरी मुलगी आमच्यासाठीं रवाना करावी. कुब्लाई-

खानानें, पत्र वाचताच, चौकशी सुरू केली; आणि कोगाटिन या नावाची सतरा वर्षांची एक अत्यंत सुस्वरूप आणि नागर चालीरितीची त्या घराण्यातील मुलगी पसंत करून, या मानकऱ्याच्याकडे धाडली. ही सर्व मंडळी आपल्या वाटेला लागली, तों वर्तमान आलें कीं, तार्तरी राजांचें युद्ध जुंपलेलें आहे आणि म्हणून नेहमीची पश्चिमेकडली वाट बंद झालेली आहे. इतक्यांत, ईस्ट इंडियाकडील समुद्रांतील बेटांवर खानाच्या कांहीं कामासाठी गेलेला मार्को पोलो परत आला; आणि तिकडे कोणकोणचे देश आहेत, जलप्रवास कसा सुखाचा आहे, इत्यादी हकिकती त्यानें खानाला सांगितल्या. मानकऱ्यांनींही त्या ऐकल्या; आणि त्यांना वाटूं लागलें कीं, नेहमीची वाट जरी बंद झालेली असली तरी, मार्को पोलो ज्या समुद्रांतून सफर करून आला आहे, त्या समुद्रांतून, हिंदुस्थानला अथवा इराणला आपल्याला जातां येण्यासारखें आहे. तिकडून येऊन त्यांना आतां तीन वर्षें होऊन गेलीं होतीं, आणि म्हणून घरीं परत जाण्याची त्यांची उत्कंठा प्रबल झालेली होती. पोलो मंडळीही स्वतःच्या देशाला जावयास अतिशय उत्सुक झालेली आहेत, हें त्यांना माहीत होतें, म्हणून त्यांनीं पोलोंशी संधान बांधलें; आणि कुब्लाईखानाला विनंति केली कीं, या समुद्रांतील वाट दाखविण्यासाठी पोलोंना जर आमच्या बरोबर दिलें तर आम्ही नवरी मुलगी घेऊन स्वदेशात परत जाऊं. पोलो मंडळींनीं तर स्वदेशी जाण्याची इच्छा मागेंच दर्शित केली होती. कुब्लाईला ‘ नाहीं ’ म्हणवेना आणि म्हणून त्यानें सर्वांची तयारी करून दिली. पण तो पोलोंना म्हणाला कीं, घरीं थोडे दिवस राहून, तुम्हीं आमच्याकडे पुन्हां परत या. ते तीन मानकरी, नवरी मुलगी, मार्को पोलो, त्याचा बाप, व त्याचा चुलता, आणि मानकऱ्यांच्या बरोबरचा लवाजमा, तसेंच नवऱ्या मुलीबरोबर खानानें दिलेलीं माणसें, आणि सामानसुमान, व दोन चारशें खलाशी,

येवढ्यानी चवदा जहाजे भरलीं; आणि मानकरी हिंदुस्थानाकडे आणि पोलो व्हेनिसकडे जावयास निघाले.



तीन महिन्यांनीं ते जात्रा बेटांत आले व तेथून पुढे ते हिंदुस्थानात येऊन पोहोंचले. येवढ्या काळांत त्याच्या बरोबरचीं बहुतेक माणसें दगावलीं होतीं !

बंदरांत उतरतात, तोंच त्यांना कळलें की, राजे अरगॉन म्हणजे नवे नवरदेव हे मरण पावले आहेत; आणि कासान या नांवाचा त्यांचा मुलगा लवकरच गादीवर बसणार आहे. मानकऱ्यांनीं बापासाठीं आणलेली नवरी मुलाला अर्पण केली ! येथें मानकऱ्यांचें काम संपलें.

पोलो मंडळी आपल्या देशाकडे चालूं लागली तेव्हां त्यांना वर्तमान कळलें की, कुब्लाईखान मरण पावलेला आहे. अर्थात् पुन्हां त्या राजासाठीं चीन देशाला परत येण्याचे कारणच उरलें नाहीं. ते पश्चिमेकडे निघाले, आणि त्रिबिझोन्द वरून कॉन्स्टँटिनोपलला गेले, व तेथून आपल्या गांवीं म्हणजे व्हेनिसला १२९५ सालीं सुखरूप जाऊन पोहोंचले.

घरी परत आल्यानंतर, तिघा पोलोंनीं थोडीशी विश्रान्ती घेतली.



आणि मग मोठा मेजवानींचा बेत केला. मेजवानीला आपले सगळे

पहातां तिला शूटिंगच्या वेळची आठवण झाली होती. त्यावेळीं ती शेतांत वांकून कांहींतरी खुडीत असते असा सीन होता. तिनं स्वाभाविकपणें वक्षस्थळ झांकून जाईल असा पदर घेतला होता. पण कृष्णमूर्तींना तो पसंत पडला नाहीं! 'पदर जरा नीट ठेवा हं!" असं उद्गारून ते झट्कन् तिच्याजवळ आले होते व त्यांनीं सहजच केल्यासारखं दाखवून तिच्या वक्षःस्थळावर हात दाबून तिचा पदर सरकवला होता. तेव्हां तिला त्याचं विशेष वाटलं नव्हतं, पण आतां त्या मोठ्या रुंद गळ्याच्या चोळींतून तिचा उरोभाग किती स्पष्टपणं दिसत होता हें पाहून ती अत्यंत शरमली.

तसंच दुसऱ्या एका प्रसंगांत तिला पोहण्याच्या ड्रेसांत पडद्यावर आणलं गेलं होतं! पोहण्याचा सीन घेतां येईल असा प्रसंग त्या कथेंत कुठं नव्हताच पण शेठ नवलराम व दिग्दर्शक कृष्णमूर्ति या दोघांचंहि म्हणणं पडलं कीं, जयश्रीदेवी पोहण्याच्या पोषाखांत फार सुंदर दिसतील, तेव्हां तसा एक तरी सीन जरूर हवाच! त्या बिचाऱ्या कथालेखकाच्या म्हणण्याकडं कुणीहि लक्ष दिलं नाहीं! त्याचं म्हणणं कीं, खेडेगांवांतील ही आशिक्षित तरुणी पोहण्याच्या आधुनिक वेषांत पडद्यावर आणणं, वास्तवतेला धरून होणार नाहीं? पण त्याचं कोण ऐकणार? जयश्रीला मुळींच पोहतां येत नव्हतं! तिनं तसं म्हटलं तेव्हां दोघेहि खदखदून हंसले! "अहो, तुम्हांला पोहायला सांगतंय कोण? नुसता हा पोषाख घालून पाण्यांत पाय सोडून बसा इथं!" त्या प्रसंगाला साजेसं गाणं रचलं गेलं! म्हटलंहि गेलं! गळ्याइतक्या पाण्यांत उभं राहून तिनं हात हालवले होते. आतां तो प्रसंग पडद्यावर प्रत्यक्ष पाहतां पहाता ती विलक्षण क्षुब्ध झाली! तिनं पोहण्याचा पोषाख पूर्वी कधीं घातला नव्हता पण तरीसुद्धा तो इतका खोल गळ्याचा व विरविरीत असतो, असं तिला वाटेना! हा मुद्दामच इतका रुंद गळ्याचा

तर केला नाहींना, कीं ज्यांमधून ती किंचित् वांकली असतां तिच्या अनावृत उरोजांचं अर्धवट लाडिक दर्शन प्रेक्षकांना स्पष्टपणं व्हावं ? पाण्यांतून बाहेर आल्यावर तर त्या तंग व अत्यंत विरविरीत ओल्या आच्छादनांतून दिसणाऱ्या तिच्या उठावदार वक्षभागाकडे दृष्टी जातांच आत्यंतिक शरमेनं तिनं डोळे मिटून घेतले ! पण तिनं डोळे मिटून घेतले, तरी थिएटरमधील शेंकडों लोलुप धुंद डोळे त्याच दृश्याचं आधाशिपणानं पान करीत होते ! तों मघांचा प्रेक्षक मिटक्या मारून ते दृश्य पहात होता व जवळच्या आपल्या सोबत्याला डिवचून म्हणत होता " पाहिलंस ना ? काय मस्त दिसते ! आहे कीं नाहीं अस्मानची परी ! कलिजा फाटून जातोय नुसता ! एवढ्या एका सीनसाठींच लोकं धांव घेतात नुसती ! " जयश्रीनं कानांत बोटं घातली ! समोरचं ते पडद्यावरचं दृश्य, आपली ती अर्धनग्न मूर्ति तिला पहावेना ! त्या हलक्या दर्जाच्या लोकांचे ते कामुक उद्‌गार तिला सहन होईनात ! हजारों लाखो लोकांच्या विषयवासना जागृत करण्यापलीकडे दुसरं काय साधतं या दृश्यांनीं ! विरविरीत वस्त्राचं तें आवरण फाडून त्या हजारों धुंद कामुक नजरा आपल्या नग्न देहावर खिळल्या आहेत असा तिला भास होऊं लागला ! स्वतःची तिला शिसारी आली. स्टुडिओंत असतांना, पडद्यावर आपण इतक्या उत्तान, मादक अवस्थेंत दिसत असूं असं तिला वाटलं नव्हतं ! आतां मात्र पडद्यावर दिसणारी स्वतःची ती अर्धनग्न मूर्ति— तिला किळस आली !

पडद्यावर दृश्यं सरकत होती. पण जयश्रीला आतां कांहीं दिसत नव्हतं कीं ऐकूंही येत नव्हतं ! तिनं डोळे मिटून घेतले होते. तरी ते मघांचंच दृश्य तिच्या अंतःचक्षूसमोर दिसत होतं ! पैशाच्या नादानं आपण शेवटीं ह्या हीन अवस्थेला येऊन पोंचलों ना ? पैशासाठीं शरीरविक्रय करणारी वेश्या व पैशासाठीं शरिराचं असं उत्तान हिडीस प्रदर्शन करणारी नटी

यांत काय फरक राहिला? ही काय कला म्हणायची? कला! कुठं आहे कला? शरीराच्या अवयवांचं असं उघडं प्रदर्शन मांडणं हीच कला होती कां? आणि प्रेक्षक तरी सिनेमा पहायला येतात, ते अभिनय पहायला, कीं स्वतःच्या क्षुद्र विषयवासनांचा धुंद प्रक्षोभकारी उन्माद अनुभवायला!

आणि ह्या स्वतःच्या सौंदर्याचं असं उघडं प्रदर्शन मांडण्यासाठीच कां तिला 'अभिनयसम्राज्ञी' हा किताब मिळाला होता?

छेः! यापुढं हे सगळं बंद झालं पाहिजे. यापुढं असल्या हीन दर्जाच्या चित्रपटांत काम करायचं नाहीं! झाला एवढा अधःपात पुरे झाला!

"काम करायचं नाहीं? मग काय करायचं!" तिच्या आईचे उद्गार तिला आठवले. 'हे वैभव सोडून भिकारीण हो!'' होय! चित्रपटांत काम करायचं नसेल तर हे वैभव सोडलंच पाहिजे! काय मिळालं ह्या वैभवानं? अनिलकुमारांच्या बरोबर नाटकांत काम करीत होतो, तेव्हां जे अंतःकरणाचं समाधान मिळत होतं, त्याच्या शतांशानं तरी समाधान ह्या चित्रपटांत काम करण्यानं मिळालं आहे कां? सारखी हुरहूर, कांहींतरी गमावलं असल्याची जाणीव! शेटजी व कृष्णमूर्ती सारख्या माणसांची पापी लगट सहन करून घेण्याइतका मानसिक अधःपात! छे! हें वैभव दूर केलंच पाहिजे!

पण कसं करायचं? हा काय आपला एकटीचा प्रश्न आहे? अजून शेटजींचं आपण देणं लागतो आहो! पैसा पुष्कळ मिळतो खरा पण तसाच खर्चेही होऊन जातो! भावंडं कॉलेजांतून शिकताहेत! पाठचा भाऊ तर अमेरिकेला उच्च शिक्षणासाठीं गेला आहे! आपण चित्रपटांत काम केलं नाहीं तर पूर्वीसारखी गरिबींत ही सर्व रहातील का? आई आजारीच असते हल्लीं! आपण हाल काढूं पण ह्या सर्वांचं काय होणार?

तिला अनिलकुमारांची आठवण झाली! तिचं कॉन्ट्रॅक्ट झाल्यानंतर ते तिला भेटले होते, त्यानंतर पुन्हां कधीही ते तिला भेटले नव्हते! आपला

हा चित्रपट त्यांनीं नक्कीच पाहिला असेल ! अरेरे ! आपला हा अधःपात पाहून काय मत झालं असेल त्यांचं आपल्याबद्दल ? ते पुन्हां कधीही तिला भेटले नव्हते, यांतच सर्व आलं !

एकदां शेटजीबरोबर ती मोटारींतून कुठेतरी जात असतांना तिनं त्याना पाहिलं होतं व हांक मारली होती ! पण हांक न ऐकतांच ते दूर निघून गेले होते !

होय ! ते दूर गेले होते ! आणि जयश्री एकटीच ह्या जाळ्यांत गुंतून पडली होती ! तिला दुसरा मार्ग नव्हता ! कुणाच्या, कशाच्या आधारावर बाहेर पडणार होती ती ? सगळ्यांकडून जखडून गेली होती ती ! आतां मरेपर्यंत असंच, ह्या गुलामगिरींत पिचत रहाण्याशिवाय कोणता मार्ग मोकळा होता तिला ?

एक सुस्कारा टाकून ती उठली ! डोळ्यांत आलेले अश्रु पुसून तिनं आरशांत पाहिलं व शेटजीबरोबर पार्टीला जाण्यासाठीं म्हणून केषभूषा करण्यास सुरुवात केली !

खालून तिच्या आईची हाक ऐकूं आली, 'जया, आटपलं कीं नाही अजून ?'



# सा र जा

"अहो, काय सांगू तुम्हांला ? मोठ्या शिताफीनं आज पकडली हिला ! बरेच दिवसांपासून संशय होता मला, पण बोलणार कसं ? ही सारजा म्हणजे मोठी अब्रूदार, खानदानी, नेकीची बाई ! पुराव्यावांचून हिचं नांव घेणार कसं ? आज बाकी अगदीं डोळ्यांत तेल घालून बसलों होतों हिच्या पाळतीवर ! कोठींतून लपत छपत बाहेर आली मात्र, तोंच पकडली ताबडतोब ! मुद्देमालच सांपडला जवळ, मग काय करते ? बाकी माझ्या विनवण्या खूप केल्यान् मात्र 'सोडून द्या, घरीं पोर फार आजारी आहे, पोरासाठीं नेत होते. एकदा सोडून द्या. बाईसाहेबांपर्यंत नेऊं नका म्हणून !' पण सोडून देणार कशी ? आपल्या मालकांशी बेइमान व्हायचं ? त्यांचं मीठ खाल्लंय आपण ! खाल्लया अन्नाला जागायला नको का ? काय जगोबा ?" शिरवाडीच्या जमीनदारांच्या वाड्यांतला सदोबा पाणक्या सभोंवतालीं जमलेल्या घोळक्याकडे मोठ्या दिमाखानें पहात म्हणाला.

जगोबांनीं तोंडांतली विडयाची पिचकारी दूर उडवली व मालकाच्या खिशांतल्या खास सिगारेटचा धूर सोडीत "व्हय् व्हय् ! असंच नव्हं का ! खाल्लया मिठाला जागायाला व्होवं ! अन्नदात्याशीं बेइमान व्हऊन कुठल्या नरकांत जावं बाबा ?" असे मोठ्या गंभीरपणें उद्गार काढले.

वाड्यांतील सर्व नोकरांच्या दृष्टीचा व उपहासाचा विषय झालेली ती दुर्दैवी बाई—सारजा—त्याच वाड्यांत नोकर होती ! खालीं मान घालून

एका कोपऱ्यांत बसली होती बिचारी! चोरीचा मुद्देमाल म्हणजे सुमारें शेरभर तांदूळ तिच्या पुढ्यांतच एका लहानशा फडक्यांत बांधलेले पडले होते. ज्या सदोबाला आजवर नजरेच्या जरबेंत दोन हात दूर ठेवले, त्याच्याच विनवण्या करणें तिच्या अगदीं जिवावर आले होते. पण ही लाचारी केवळ पोटच्या पोरासाठीं करणें तिला भाग पडलं. लाडक्या राजाची आठवण होताच सारजेचं हृदय भरून आले! आपल्या फाटक्या गोधडीवर पडून तिच्या वाटेकडं पोर दृष्टि लावून तळमळत पडलं असेल! आई रोज दुपारी येते त्याप्रमाणें आज न आलेली पाहून मुकाट्यानं आसवं ढाळिली असतील त्यानं! आतांशा दोन तीन महिन्यांपासून त्याची प्रकृति मुळीच बरी नव्हती! एरव्ही राजा म्हणजे किती गोड व अवखळ पोर! त्याच्या तोंडाकडं पाहूनच धनाजीच्या मृत्यूचं दुःख सारजा थोडं-तरी विसरूं शकत होती. पूर्वीच्या आपल्या सुखी संसाराची आठवण येऊन सारजेला दुःखाचा हुंदका आला! धनाजी, सारजा व चिमुकला राजा! गरिबींत सुद्धा किती समाधानी व आनंदी कुटुंब होतं! सत्तेचं घरकूल व जमिनीचा तुकडा! अगदीं दृष्ट लागण्यासारखा संसार होता सारजेचा! आणि खरंच कुणा पापी चांडाळाची दृष्ट लागली कोण जाणे! आणि नाहींतरी सारजा होतीच तशी दृष्ट लागण्यासारखी। साऱ्या गांवांतच काय पण आजूबाजूच्या गांवांत तिच्या रूपाला तोड नव्हती; आणि पुन्हां कुणाकडं डोळा वर करून बघायची नाहीं कधीं! तिच्या रूपाची व जवानीची धुंदी गांवगुंडांच्या डोळ्यांवर येई पण दुरून जिभल्या चाटण्यापलिकडं कुणाची डाळ शिजणें शक्य नव्हतें. धनाजीची जरब तशीच जबरदस्त होती. बिशाद काय कुणी त्याची अगर—त्याच्या सारजेची खोडी काढेल? संध्याकाळीं सोम्याहिऱ्याला घेऊन धनाजी शेतावरून परत येई तेव्हां राजाला कडेवर घेऊन सारजा उभी असे! धनाजीच्या त्या रुबाबदार मूर्तीकडे पाहून सारजेला आभाळ ठेंगणं होई!

पण हें सुख लवकरच संपलं ! केवळ ४ दिवस ताप येऊन धनाजीसारखा चौघांना भारी असलेला गडी, एकाएकी आटोपेल हे कुणाला सांगूनसुद्धा खरं वाटलं नसतं ! दैवाचा हा निष्ठुर आघात इतका अकल्पित होता कीं त्याची सत्यता पटायलासुद्धा सारजेला बराच वेळ लागला ! धनाजी कायमचा गेला. संध्याकाळीं आपल्या आवडत्या बैलजोडीला घेऊन, गाणं गातगात, धनाजी पुन्हां पूर्वीप्रमाणें कधींच येणार नाहीं हें खरंच वाटेना तिला ! सारजेला आकाश फाटल्याप्रमाणें झालं.

पण काळ काय कुणाकरतां थांबून रहातो ? सगळं दुःख आवरून पुढचा विचार करणं सारजेला भागच होतं ! आजवर धनाजीच्या जिवावर जगाची पर्वा केलीं नव्हती तिनं पण त्याच जगाच्या दयेवर जगावं लागूं लागलं तिला ! शेत खंडानं देऊन व परसांतला भाजीपाला विकून कसंबसं वर्ष ढकललं तिनं ! पण पुढच्या वर्षी धनाजी असतांना येई, त्याच्या अर्ध्यानंच जेमतेम पीक आलं ! खंडकऱ्यानं खंड वेळेवर दिला नाहीं. अर्थात्च ज्या जमीनदाराच्या वाड्याची ती पायरी कधीं चढली नव्हती, त्याच्याकडे जाऊन, दुपटीच्या भाताची कबुली देऊन, खायला भात आणावं लागलं तिला !

पुढच्या वर्षी सगळ्याची फेड करून टाकूं अशी आशा होती तिला पण त्यावर्षी निसर्गाचा कोप झाला व पाऊस वेळेवर न पडल्यामुळें सगळं पीक करपून गेलं ! त्यावर्षीही कर्जाची फेड झाली नाहीं आणि दरवर्षी कांहींनाकांहीं कारण होऊन कर्जाच्या डोंगरांत सारजा बुडून गेली ! जमीनदारानं तगादा सुरू केला व अखेर त्या त्रासांतून सुटण्यासाठीं जमीन कायमची त्याच्या हवाली करणं हाच एक उपाय तिला दिसला ! वास्तविक पहातां जमीनदाराला तिच्या जमिनीची एवढी तहान लागली नव्हती ! त्याचा डोळा कशावर आहे हें ती जाणून होती ! तिला जास्तीजास्ती अगतिक करावं व शेवटीं तिनं आपल्याला शरण यावं हीच त्याची इच्छा

होती व शेवटीं त्याच्या इच्छेप्रमाणंच घडलं ! दिवसेंदिवस किरकोळ भाजी-पाला विकून निर्वाह होईनासा झाल्यामुळें तिला जमीनदाराच्या वाड्यावर नोकरी धरणं भाग पडलं ! आणि तेव्हांपासूनच तिच्या खऱ्या दुर्दैवाला सुरुवात झाली ! सारा दिवस मरमर मरावं आणि सर्वांची कुजकट बोलणी ऐकून घ्यावी ! त्यांतून तिचं असामान्य रूपही तिचं वैरी झालं होतं ! आचारीपाणक्यापासून तो खुद्द मालकाच्या स्वारीपर्यंत सर्वजण तिच्या शीलाचा बळी घेण्यासाठी टपून बसले होते. ह्या जाचाला ती फार कंटाळली होती. आणि इतकंहि करून पंधरा रुपयांवर दोघांचं पोट भरतांना कोण मारामार पडे ! आपल्या लाडक्याच्या तोंडाकडं पाहून हें सर्व हाल ती सहन करीत होती. पण कठोर दैवाला तिचं एवढंही सुख पहावलं नाहीं. तिचा राजा आजारी पडला. गुलाबाच्या ताज्या फुलाप्रमाणं असणारा राजा, दिवसेंदिवस बकुळीच्या फुलाप्रमाणं कोमेजू लागला. गांवांतल्या वैद्यबुवांना दाखवून औषध सुरू केलं तिनं, पण गुण येईना ! हे पाहून मात्र अगदीं धीर खचला तिचा. आतां त्याला नुसती कण्हेरी, पेज द्यायला सांगितलं होतं त्यांनीं ! लढाई संपून २–३ वर्षं झाली तरी रेशनिंग होतंच ! उलट अधिकाधिक धान्य कमीच होत चाललं होतं ! आठवड्याला माणशी पावशेर तांदूळ मिळत ! त्यांत पेज कण्हेरी कशी करणार ती ? शेजाऱ्यानांच पुरत नव्हतं तर ते उसनं तरी कुठून देणार ? स्वतः उपास काढून ती राजाला कण्हेरी करून देई ! पण असं कुठपर्यंत चालणार ? वाड्यांतली कोठी तांदळांनीं भरली होती पण त्याचा काय उपयोग ? शेवटी लाचारी पतकरून तिनं बाईसाहेबांकडं थोड्या तांदळाची मागणी केली ! पण त्या दगडी दिलाच्या मूर्ख श्रीमंत स्त्रीनं ती झिडकारून लाविली ! वाड्यांतलं कोठार तांदळानं भरलेलं असतांना, पावशेर तांदळांत, आठवडा, माणसं कसा काढतात हें कुठून तिला कळणार ? त्यांतून स्वरूपवान सारजेवर त्यांचा मनांतून रागच होता ! त्यांनीं तांदूळ दिले तर नाहींतच पण वर

एक व्याख्यान ऐकवलं तिला ! सारजा निराश झाली ! भुकेमुळं मलूल झालेल्या राजाकडं पाहून भडभडून येई तिला ! आज ४ दिवस तांदूळ मुळींच घरांत नव्हते ! 'आई भूक लागली, कांहींतरी खायला देग' हे राजाचे करुण शब्द ऐकून तिची आंतडी तुटू लागली. शेवटीं आज तांदूळ आणायचेच—सरळ मार्गानं मिळाले नाहीत तर चोरी करून आणायचे—असा निश्चय करून ती घरून निघाली. व त्या निश्चयाचं पर्यवसान काय झालं तें वर सांगितलेच !

बाईसाहेबांची वामकुक्षी पुरी होईपर्यंत सदोबाच्या पहाऱ्यांत सारजेला बसावं लागलं व त्या हलकट माणसाची गलिच्छ कुचकट बोलणी ऐकून घ्यावी लागली ! तिचा देह वाड्यांत होता पण मन केव्हांच राजाकडं जाऊन पोंचलं होतं ! आजतरी आई तांदूळ आणून पोटभर पेज करून देईल या आशेवर पोर आपल्या वाटेकडं दोन्ही डोळे लावून पडलं असेल !

पण आतां पुढं होणार तरी काय ? आपल्या नशिबांत काय वाढून ठेवलंय आतां ?

विचार करतां करतां सारजेचं मन थकून गेल ! अखेर बाईसाहेबांचा चहा झाल्यावर तिचा खटला दोघा मालकांच्या पुढं उभा राहिला !

"कायग सारजे, मी आजवर तुला मोठी प्रामाणिक, अब्रूदार, खान-दानीची बाई समजत होते ! आणि आज तूं तांदूळ चोरलेस म्हणे ! आतां ह्या सदोबानं आज पकडलं म्हणून बरं ! आजपर्यंत किती चोऱ्या केल्या असशील कुणास ठाऊक !" बाईसाहेब तिरस्कारानें म्हणाल्या.

"नाहीहो ! बाईसाहेब, मी आजपर्यंत सुतळीच्या तोड्यालासुद्धां बोट लावलं नाहीं ! आतां मात्र पोराच्यासाठीं हा गुन्हा घडला ! मोठे आहांत, दयावंत आहांत मालक तुम्ही ! एकवार माफ करा ! माझं पोर घरीं आजारी, उपाशी आहे हो ! सोडून द्या मला ! " सारजा काकुळतीनें म्हणाली.

"हं ! एकवार तुला सोडून दिलं म्हणजे दुसऱ्या नोकरांनां चांगलंच फावेल कीं ! ते कांहीं नाही ! अपराध्याला शिक्षा ही झाली पाहिजेच ! तुम्हां लोकांनां चांगली जरब बसेल अशीच शिक्षा केली पाहिजे"— बाईसाहेब पुढं काहीं बोलणार तोंच साखरवाडीच्या जमीनदारीणबाई बसायला आल्याची वर्दी आली. शिरवाडीच्या मानानं साखरवाडीच्या जमीनदारांची खूप इस्टेट होती व त्यांच्या एकुलत्या एक विजयेशी आपल्या बाळासाहेबाचं लग्न जमावं अशी बाईसाहेबाची मनिषा होती. अर्थात् त्या तावडतोब निघून गेल्या. जातांना "असली चोरटी बाई माझ्या घरांत नको" असा हुकूम देऊन गेल्या. आतां जमीनदाराच्या तावडीत सारजा एकटी सांपडली. मनांतला पुष्कळ दिवसांचा हेतु आतां साध्य होणार अशा अपेक्षेनें त्यांनां आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या ! तावडींत सांपडलेल्या भक्ष्याकडे वाघानें क्रूर दृष्टीनें पहावें तसे ते सारजेकडे भुकेलेल्या अतृप्त दृष्टीनें पाहूं लागले. त्यांची ती दृष्टी पाहून सारजेच्या काळजाचें पाणी पाणी झालें.

'हं ! मग काय सारजे ? काय तुझा विचार आहे ?" जमीनदार घोगऱ्या, जड स्वरांत म्हणाले. दारूची धुंदी चांगलीच चढली होती स्वारीला ! सगळ्या नोकरांना तेथून हांकलून देऊन, एकटी सारजा आतां आपल्या तडाक्यांत सांपडलीच अशा आनंदानें ते अगदीं खूष झाले होते. सारजा मात्र आंतून अगदीं भिऊन गेली होती. शेवटचा एक निकराचा प्रयत्न करून पहाण्याचं ठरविलं तिनं !

"मालक, आपण मोठी माणस ! गरिबाकडं जरा दयेनं पहा ! माझं पोर खरोखरच घरीं आजारी आहे ! भुकेनं तडफडतं आहे ! वाटलं तर कुणालातरी पाठवून खात्री करून घ्या ? त्याच्यासाठीं मी हें पाप केलं ! त्याच्या कडे पाहून सोडून द्या मला ! माझ्याशिवाय त्याला कुणी नाहींहो !"

"हाः हा हाः" जमीनदार विकटपणें हंसले ! "सारजे काय त्या मरतुकड्या पोरासाठीं एवढा जीव टाकतेस ? माझं ऐकलंस तर एक सोडून—"

"हां मालक ! पुढें बोलूं नका ! आईच्या मायेची कल्पना नाहीं आपल्याला ! माझ्या पोरांपुढं दुनियेची किंमत नाहीं मला ! आणि गरीबांनां पण अब्रू असते. अब्रू घालवून—"

"अग कसली अब्रू घेऊन बसली आहेस ? सोन्यामोत्यांनीं मढवून काढीन तुला ! ह्या मूठभर तादळाची काय कथा ? पोती रिचवीन तुझ्या घरांत ! नीट समजून घे ! जर माझ्या मर्जीप्रमाणें वागलीस तर बरं आहे ! नाहींतर पोलिसच्या हवालीं करीन तुला ." जमीनदार निश्चयानें म्हणाले.

सारजेच्या डोळ्यापुढं काजवे चमकले. हा दुष्ट बोलल्याप्रमाणें करण्यास चुकणार नाही ही खात्री होती तिला ! पण—पण ती— काय करणार होती ? पोराचा बळी कीं शीलाचा बळी ? सारजेला कांहीं सुचेना ! पोरासाठीं चोरीचा गुन्हा केला तो केला. आतां निदान अब्रू विकण्याचा तरी नको ! धनाजीच्या मागं इतके दिवस जी अब्रू व जें शील प्राणापलीकडं संभाळलं, त्याचा असा उघड्या डोळयानीं बळी देण्याचं तिच्या जिवावर आलं. तिनें जमीनदाराच्या खूप विनवण्या केल्या, पण तो नराधम आपल्या निश्चयापासून काडीमात्र परावृत्त झाला नाहीं. शेवटीं आपला पापी हेतु साध्य होत नाहीं, हें पाहून तिचा सूड घेण्याचे बुद्धीनें, त्यानें खरोखरच फौजदाराला बोलावून त्याच्या स्वाधीन केलें तिला.

आठ दिवस कोठडींत राहिल्यावर तिचा खटला उभा राहिला. चोरीचा मुद्देमाल पाहून सारजा थक्कच झाली ! पंचनाम्यांत शेरभर तादूळ नव्हते, तर बाईसाहेबांचे २–३ किरकोळ दागिने, जरीची लुगडी हा माल नमूद केलेला होता. साक्षीदार तयारच होते.

सारेजला एक वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली.

आणि तिचा लाडका राजा ?

पैंजणांचा मंजुळ छुम् छुम् आवाज, सारंगी तबल्याची साथ, जमलेल्या समुदायांतून 'वहावा'चा गजर व सिगारेटचा धूर यांनीं वातावरण भरून गेले

होतें. चंद्रावळ कलावंतीण नृत्य करीत होती ! चंद्राच्या कंठाची माधुरी जितकी अप्रतिम होती तितकीच निसर्गदत्त सौंदर्याची देणगीही तिला लाभली होती.

तिच्या गायनापेक्षा तिच्या नृत्यावरच प्रेक्षक जास्ती खूष होते ! कारण नृत्याच्या निमित्तानें होणाऱ्या तिच्या विविध अंगप्रत्यंगाचें दर्शन त्यांना जास्ती लोभनीय वाटे ! चंद्राची नाजुक परंतु सौष्ठवपूर्ण देहयष्टि, चंद्राचा लाडिका नखरा, तिचे वेड लावून सोडणारे हाव भाव ! शिरवाडीकर नुसते बेहोष होऊन गेले होते.

मध्यभागीं प्रमुख बैठकीवर लोडाला टेकून—टेकून म्हणण्यापेक्षा निजून—शिरवाडीचे जमीनदार, चंद्राकडे लोलुप नजरेनें पहात होते. श्रोत्यां‌पैकीं शुद्धीवर—फारच थोडेजण होते. अशाच एकदोघा जणाची कुजबूज एका कोपऱ्यांत चालली होती.

"काय रे पांखरू आलं तरी कुठून ! नुसती विजली आहे. नाचते आहे तर दिल अगदीं फाटून जातोय ! सहाच महिने झाले इथं येऊन पण गांवाला नुसतं वेड लावलय."

"अरे, गांवाला लागून फायदा काय ? बडं प्रस्थ आहे तें ! हा आपला जमीनदार पहा ! रोज येतो इथं ! दागिने काय, कपडे काय जे म्हणेल ते ओततोय पायाशीं ! सगळया इस्टेटीच वाटोळं होण्याची वेळ आलीय, पण इष्कापुढं कशाची पर्वा नाहीं स्वारीला ! कुठून आली आहे कुणास ठाऊक ! बाकी आली तेव्हां अगदीं एकटी अन् एका वस्त्रानिशी आली होती. पण आतां रुबाब पहाल तर राणीचा !"

चंद्रावळीचा नाच संपला. पायांतले घुंगुर सोडून ती बैठकीवर बसली. नेहमीप्रमाणें श्रम परिहाराकरतां मद्याचे चषक आले ! नंतर चंद्राच्या हातची नाजुक, मसालेदार पट्टी घेऊन एकेकजण उठून जाऊं लागला. साजिंदेही

आपापल्या वाद्यांची आवराआवर करून निघून गेले. जमीनदारांची स्वारी तेवढी एकटी राहिली ! चंद्रानें माडीचें दार बंद केलें.

"चंद्रा, चंदर तूं माझ्या जिवाचा कलिजा आहेस ! आतां किती दिवस माझा अंत पहाणार आहेस ? तूं माझी झाल्याशिवाय माझ्या संपत्तीला शोभा नाहीं. तूं माझी राणी आहेस, महाराणी आहेस. मी तुझा बंदा गुलाम आहे."

जमीनदार, पोटांत गेलेल्या अमृताचा परिणाम होऊन, बरळूं लागले. अर्धवट धडपडत उठून त्यांनीं चंद्राला जवळ ओढली.

"इश्श, राणी, राणी म्हणून तोंडानं म्हणायचं ! राणी शोभलीतर पाहिजे ना ह्या माझ्या राजाजवळ ?" लडिवाळपणें त्याच्या गळ्यांत हात घालीत चंद्रा म्हणाली.

"मग ह्या माझ्या राणीला पाहिजे तरी काय ? बोल, तूं मागशील तें देतो."

" पुष्कळ ऐकल्या तुमच्या फुकाच्या गप्पा आजपर्यंत !" चंद्रा त्याचा हात झिडकारून म्हणाली. " आज पुन्हां एकदा बजावून सांगते, उद्यां रात्री जर तुमच्या बायकोच्या गळ्यांतलं ते हिऱ्याचं मंगळसूत्र, माझ्या गळ्यांत दिसलं नाहीं तर पुन्हा इथं यायची तसदी आपण घेऊं नका."

चंद्रा झणकाऱ्यानें आंत निघून गेली.

जमीनदार आज मोठ्या पेचांत पडले होते. रात्र जसजशी अधिक होऊं लागली, तसतसे ते अधिकच बेचैन होऊं लागले. चंद्राकडं जाण्यासाठीं त्यांचं मन अधीर होऊ लागलं पण—आजतरी तिची मागणी पुरी केल्याशिवाय तिच्याकडं जाणं शक्य नव्हतं ! आणि ती मागणी पुरी न होण्याला एकटी आपली बायकोच कारण ! जमीनदारांना तिचा विलक्षण संताप आला ! ज्या हिऱ्याच्या मंगळसूत्रासाठी चंद्रानं इतका हट्ट धरला होता तो त्यांच्या घराण्यांत पिढ्यानपिढ्यांचा जुना, अमूल्य अलंकार होता. तें

मंगळसूत्र फार शुभदायक समजलं गेलं होतं! थोरल्या सुनेकडे वंशपरंपरा ते रहायचं! आणि अलंकार होताही मोठा सुंदर! टपोऱ्या पाणीदार मोत्याच्या दुपदरांमध्यें डाळिंबाच्या रंगाची माणकं मधूनमधून बसविली असून मध्य-भागीं अतिशय पाणिदार हिऱ्याचं पदक होतं! त्याला सभोंवती हिरवेगार पाचू जडवले होते! जमीनदारीण बाईंना फार आभिमान होता ह्या अलंकाराचा! प्राणांतीही ते दूर करावयास त्या तयार होणे शक्य नव्हते! इकडे चंद्रानेही त्याच दागिन्याकरतां हट्ट धरला होता. तुला दुसरं तसंच मंगळसूत्र नवं देतों असं सांगितलं तरी तिची समजूत पटेना! तिला तोंच पिढीजाद अलंकार हवा होता!

कुणाचा हट्ट पुरवावा तें त्यांना समजेना! शेवटीं चंद्राबळीचंच पारडं जड ठरलं! जमीनदारांनीं बायकोकडून तें मंगळसूत्र घेऊन लाडक्या चंद्राचा हट्ट पुरविण्याचें ठरविलें.

रात्रीं ११ चे सुमारास जमीनदार नेहमीप्रमाणें बाहेर जाण्याचें सोडून अंतर्गृहांत आलेले पाहून बाईसाहेब चाकित झाल्या! आणि त्यांची मागणी ऐकूनतर त्या फार संतप्त झाल्या! यःकश्चित एका वेश्येच्या नादानं, आपल्या पतिराजानीं, खुद्द आपल्या गळ्यांतील पिढीजात वंशपरंपरा वापरलेला बहुमोल अलंकार मागावा, ह्या घटनेनं त्यांच्या अंगाचा तिळपापड झाला! आज-पर्यंत घरांतील बहुतेक अलंकारांची वासलात लागलेली होती! चंद्रांच्या पायी त्यांच्या जमिनी गहाण पडलेल्या होत्या. अवाढव्य खर्च चालवण्या-पायीं काढलेल्या कर्जांचा डोंगर दिवसेंदिवस जास्तीच उंच होत होता! पण आज मात्र कळस झाला!

"मी तें मंगळसूत्र देणार नाहीं! बाळासाहेबाच्या बायकोच्या गळ्यांत माझ्या हातानं बांधणार आहे मी ते! त्या सटवीच्या पायी सगळ्याची धूळदाण झाली तरी अजून तिचा नाद सुटत नाहीं!" त्या रागानें फणकारल्या!

"देणार नाहींस म्हणजे? दिलंच पाहिजे तुला! मी मालक आहे माझ्या

इस्टेटीचा ! मला वाटेल त्याला देईन मी ! मुकाट्यानें काढून दे." जमीनदारांच्या अंगांत मूर्तिमंत हुकूमशाही संचारली होती.

पतिपत्नींची बरीच बोलाचाली झाली ! शेवटी जमीनदारानीं करूं नये ती गोष्ट केली. नोकरचाकरांच्या देखत त्यांनी पत्नीवर हात टाकला व मंगळसूत्र हिसकावून घेऊन तडक चंद्राचें घर गांठलें ! पण सर्वांच्या देखत झालेला हा अपमान त्या अभिमानी बाईला सहन झाला नाहीं. भर मध्यरात्रीं मागील दारच्या विहीरींत त्यानीं उडी घेतली ! पण जमीनदारांना त्याचें काय होय ? त्यांची प्यारी चंद्रावळ त्या रात्रीं त्याच्यावर बेहद्द खूष झाली होती ! चंद्राच्या कोमल देहाच्या लुसलुशीत मिठींत, तिच्या अधरामृताचें पान करीत, ते जगूं स्वर्गलोकीं विहार करीत होते.

"आतां का बुवा रुसवा असा ? सर्व मनासारखं आहे ना ? मग आज कां ह्या मुखचंद्राला असं ग्रहण लागलं आहे ?" जमीनदारांनीं मोठ्या लाडिकपणें प्रश्न केला. बायकोच्या मृत्यूनंतर घर त्यांनीं जवळ जवळ वर्जच केलें होते. चंद्राच्या पाशांत ते पुरते सांपडले होते. एकुलत्या एक मुलाची काय हालहवाल आहे, इस्टेटीची व्यवस्था कशी आहे, हें ते कांहींच पहात नसत ! चंद्राची काहीं इच्छा पुरवायची असली कीं दिवाणजींना अमुक रक्कम आणून द्या असा ते हुकूम सोडीत. कुठल्याही भारी व्याजानें कुठूनही रक्कम उभी राहिली कीं मग ते पुढचा विचार करीत नसत ! चंद्राही नित्य नव्या नव्या वस्तूची मागणी करी.

निरनिराळ्या शृंगारिक साधनानीं नटविलेल्या शयनगृहांत एका कोचावर चंद्रा रेलून बसली होती. सुंदर फिक्या हिरव्या रंगाच्या तलम जॉर्जेटचें पातळ व मोठ्या उघड्या गळ्याची एक झिरझिरीत चोळी या पोषाखांत तिचें लावण्य खुलून दिसत होतें. चोळींतून तिचें उन्मादक यौवन पहाणाऱ्याला भूल पाडण्यासारखे स्पष्ट उठून दिसत होते. गळ्यांत त्या मंगळसूत्राशिवाय दुसरा अलंकार नव्हता. समोर जमीनदार दुसऱ्या एका कोचावर लोळत होते.

" हो ! मुखचंद्राला ग्रहण लागलं कीं तो कायमचा मावळला ह्याची काळजी आहे कुणाला इथं ? किती दिवसांपासून म्हणते आहे कीं माझा सत्यनारायणाचा व ब्राम्हण भोजनाचा नवस फेडायचा आहे म्हणून ! नवस फेडायचा राहिला तर देवाचा कोप होईल ! पण झाला तर झाला ! चंद्रा मेली काय कीं जगली काय, पर्वा आहे कोणाला ?" चंद्रा डोळ्याला पदर लावून स्फुंदू लागली.

" छे ! छे ! तूं तर माझा प्राण आहेस ! तुझ्यावांचून दुसरं कोण आहे मला प्रेमाचं जगांत ? तुझ्यासाठीं मी काय करणार नाहीं ? ब्राह्मणभोजन घालायचं आहेना ? उद्या तयारी कर ! "

"तर तर ! तयारी करूं कशी ? माझ्याकडे काय तुमच्या सारखी तांदळाच्या पोत्यांनीं भरलेली कोठारं आहेत ?"

" हात्तिच्या ! एवढंच ना ? उद्या ५ पोती तांदूळ तुझ्याकडे पाठवून देतो मग तर झालं ना ? "

" खरंच गडे, एवढा तांदूळ ठेवला तरी कुठं बाई आपण ? वाड्यातल्या कोठारांत तर ठेवतां येत नाही ! मग इतका सांठा असतो तरी कुठं ? मला एकदां आपली सगळी इस्टेट, जमीनी दाखवाव्या ना. उद्यांच हा सांठा दाखवावा गडे ! मी तांदूळ पसंत करणार माझ्या सत्यनारायणा करतां ! दाखवता ना ?" चंद्रानें मुरका मारून प्रश्न केला.

तिच्या त्या लाडिक नखऱ्यानें जमीनदार घायाळ झाले. तो गुप्त सांठा दुसऱ्या दिवशीं दाखविण्याचें वचन घेतलें तेव्हांच त्यांची प्रीतिदेवता त्या दिवशीं त्यांच्यावर प्रसन्न झाली.

दुसऱ्या दिवशीं तिनें आपला हट्ट पुरा केला. दुपारी शिरवाडी पासून ४ मैल दूर असलेल्या एका मोडक्या, भुताटकीबद्दल प्रसिद्ध असलेल्या बंगल्याच्या तळघरांतला तांदळाचा तो सांठा पाहून तिनें मोठा आनंद व्यक्त केला. तांदळाच्या निरनिराळ्या जाती पाहून आपल्यासाठीं उत्तम-

येथें सोन्याचें नाणें चालतें. पुरुष आणि बायका दाताला सोन्याचीं कवचें करून घालतात आणि हातांवर व पायावर गोंदून घेतात.

खालीं उतरल्यानंतर बंगाल प्रान्त लागतो. बंगालच्या राजाची आणि कुब्लाईखानाची एक फार मोठी लढाई झाली. आणि पंजाबांतील पोरस राजाच्या सैन्यातील हत्तींनीं जसा पोरसचा नाश केला, तसा बंगालच्या राजसेनेंतील हत्तींनींही बंगालच्या राजाचा केला.

शेजारी मीन देश म्हणजे ब्रह्मदेश लागतो. येथले उंच उंच मनोरे पॅगोडा–पहाण्यासारखे असतात. एका मनोऱ्यावर एक इंच जाडीचा सोन्याचा पत्रा बसविलेला आहे. त्यामुळें जिकडे तिकडे सोनेंच सोने दिसतें. मनोऱ्याच्या शिखरावर सोन्यारुप्याच्या लहान लहान घंटा टांगलेल्या आहेत. वारा सुटला कीं, त्या साऱ्या वाजूं लागतात. पूर्वेकडे कॉन्जिगू नावाचा प्रांत लागतो. या प्रांतांत सोनें वाटेल तितके सांपडते. येथले लोक आपलीं अंगें गोंदवून घेतात. येथल्या रानांत हत्तींचे मोठमोठाले कळप हिंडत असतात. पूर्वेच्या बाजूला अत्रू आणि थोलोआन हे प्रांत ओलांडले म्हणजे, त्रिटिग्वी नांवाचे सुंदर शहर लागतें. इकडल्या टांपूत वाघांचा सुळसुळाट फार आहे. त्यांची शिकार करावयास लागणारे भयंकर कुत्रे येथील लोक बाळगतात. सिंचित्रयातु, लिंग्वि, प्रिंग्वि अशा तऱ्हेची अनेक शहरें पहात पहात, आग्नेय दिशेनें गेलें म्हणजे यांगत्सिक्यांग नदी लागते. जगांतली ही सगळ्यांत मोठी नदी असली पाहिजे. ही कोठें कोठें तर, दहा मैल रुंद आहे.

टिंग्वि, वाग्वि, हीं शहरें करीत करीत पुढें गेलो म्हणजे, आपण किन्साई शहराला पोहोंचतो. याला अमरपुरीच म्हणतात! आम्ही या शहरांत पुष्कळ दिवस राहिलों; आणि याची सर्व तऱ्हेची शोभा अगदीं बारकाईनें पाहिली. या शहरांतल्या रस्त्यांना दगडाविटांची फरस बंदी केलेली


व्हेनिस
दमास्कस
तेहरान
शिबरघान
काशगार
पेकिंग
हॉंगकॉंग
युनान
भामो
सोमनाथ
मुंबई
त्रिवेन्द्रम
निकोबार

आहे आणि शहरापासून दूर दूरच्या गांवांना जाणारे सगळे रस्ते अशा फरसबंदीनेंच मढवलेले आहेत. शहरांत दुतर्फा मोठमोठालीं घरें, आणि उंचच्या उंच हवेल्या लागलेल्या आहेत. रस्त्याच्या दोन्हीं बाजूला फरशी ठेवून, मधल्या भागावर वाळूही पसरलेली असते. कमानीचीं गटारें ठेवलेलीं असल्यामुळें, रस्त्यांवर पडलेलें पाणी नदींत वाहून जातें. एकाद्या ठिकाणीं आग लागली तर, नगारे वाजवण्याची चाल आहे. रात्रीच्या वेळीं सरकारी शिपाई सगळीकडे गस्त घालीत असतात. किन्साई शहर सोडून आग्नेयेनें पुष्कळ पुढें गेलें म्हणजे कोंचा नांवाचा परगाणा लागतो. शेवटीं जातां जातां झाईतून या बंदराला आपण जाऊन पोहोंचतों.

झिपॅगू म्हणजे जपान हें पूर्वेकडील सागरांत एक मोठें बेट आहे. त्रांब्जीच्या म्हणजे चीनच्या किनाऱ्यापासून १५०० मैलावर हें बेट असावें. येथील लोक चांगले सुधारलेले आहेत. या देशाचा राजा इतका श्रीमंत आहे कीं, याच्या राजवाड्यावर सोन्याचाच पत्रा बसवलेला आहे. राजाच्या महालाची पटई सोन्यानें मढवलेली आहे. या बेटांत मोतीही खूप सांपडतें. रंग ताबूस असून, त्याचा दाणा गोल आणि टपोरा असतो. हा देश जिंकून घेण्यासाठीं कुब्लाईखानानें फार मोठे आरमार पाठवलेलें होतें. पण हे कुब्लाईखानाचें आरमार अक्षरशः वाताहत झाले.

१५०० मैल समुद्र ओलांडून दक्षिणेकडे आलों म्हणजे अंबा—इंडो-चायना—या देशाला आपण येतों. या देशाचा राजा कुब्लाईखानाला खंडणी देतो. ही खंडणी म्हणजे हत्तीचे कळप असतात. १२७८ त हा देश जिंकावा म्हणून कुब्लाईखानानें तयारी केली होती. तेव्हां येथील राजानें त्याला कळविलें कीं, आम्ही दरसाल हत्तीचा एक कळप आणि चंदनाचें लांकूड खंडणी म्हणून पाठवीत जाऊं. येवढ्या खंडणीवर खूष होऊन कुब्लाईनें स्वारीचा बेत रहीत केला.

या देशांतून जावा नांवाच्या एका मोठ्या विस्तीर्ण बेटांत आपण जातों. हे बेट निरनिराळ्या मसाल्याच्या झाडानीं भरलेले आहे. सोनें तर येथें इतकें सापडतें कीं, चीन मधले व्यापारी त्याचा जंगी व्यापार चालवतात. नैॠत्य दिशेने समुद्रांत गेलें म्हणजे, सोड्डर आणि कोड्डर हीं दोन बेटे लागतात. तेथून पुढे सुमात्रा बेटांत जातां येतें. नोक्यूरान् म्हणजे निकोबार आणि आगायान-म्हणजे अंदमान, हीं बेटें पश्चिमेकडे जातांना वाटेतच लागतात. शेवटी आपण झिलान–म्हणजे–सिलोनला पोहोचतों. या झिलान बेटांत आद्दीम म्हणजे पहिला मानवप्राणी, त्याची समाधी आहे, असें लोक सागतात. पण बेटातले लोक म्हणतात कीं, ही समाधी बुद्धाची आहे. या बुद्धाची कीर्ति कुब्लाईखानाच्या कानापर्यंत गेली. त्याला कळले कीं, याचे कांहीं अवशेप या बेटात अजूनही आहेत. त्याने तावडतोब झिलानच्या राजाकडे एक मंडळ पाठविलें आणि या अवशेपांची मागणी केली. राजानें त्याना दोन दांत, एक केसाची बट, आणि पाचूचे केलेले एक सुंदरसे भांडें या वस्तु दिल्या. त्या घेऊन मंडळ परत गेले. या अवशेषाचे स्वागत करण्यासाठी कुब्लाईखानाची सारी राजधानी तटाबाहेर आली !

झिलांग म्हणजे सिलोन अथवा सिंहलद्वीप हे बेट सोडून, पश्चिमेच्या रोखानें आपण ६० मैल गेलों, म्हणजे आपण माबार (म्हणजे मलबार) येथें पोचतों. माबार हा हिंदुस्थान देशाचा एक प्रांत आहे. आणि हिंदुस्थान देश सगळ्या जगांत अतिशय संपन्न असून, अतिशय थोर म्हणून गाजलेला आहे. या माबारांत चार राजे आहेत; आणि या चौघांत सेंदरबंदी ( म्हणजे झामोरिन् ) हा मुख्य आहे. याच्या राज्यांत समुद्रकांठीं मोती सांपडतात. येथें समुद्राचें पाणी दहाबारा पुरुषच खोल असतें; आणि कोठें कोठें तर, दोन

पुरुषांवरच मोती सांपडतात. मोती काढणारे कोळी आपल्या अंगाभोंवतीं एक जाळें गुंडाळतात; आणि या जाळ्याच्या पिशवींत मोत्याचे शिंपले भरून, समुद्राच्या तळाशीं गेलेले कोळी वर येतात. मोत्यांचा दाणा चांगला गोल व अतिशय तेजस्वी असतो. कोळी जिथें बुड्या मारतात, तेथें माशांचा उपद्रव फार मोठा असतो. म्हणून व्यापारी लोक मंत्र जाणणाऱ्या कांहीं ब्राह्मणांना बरोबर नेतात. हे मांत्रिक त्या माशांवर मंत्र घालतात, आणि मग मासे कसलीही हालचाल करीत नाहींत. मोती काढण्याचें काम ·दिवसभर चाललेलें असतें. संध्याकाळ झाली की, हे मांत्रिक आपला मंत्र परत घेतात. आणि मग मासे पुन्हा खेळूं लागतात. अर्थात् रात्रीच्या वेळीं बुडी मारून शिंपले काढावे, असें जर कोणी चोरट्याने मनांत आणले, तर त्याचा प्रतिबंध आपोआपच होतो. या ब्राम्हणांचे मंत्र पशुपक्ष्यांवर सुद्धां चालतात. एप्रिल महिन्यांत हें मोती काढण्याचें काम चालूं होतें; आणि मे महिन्याच्या मध्याला तें संपतें. हा हक्क व्यापाऱ्यांना राजाकडून विकत घ्यावा लागतो; आणि हक्काचे म्हणून, सांपडलेल्या मोत्यांतील दहा हिस्से राजाला द्यावे लागतात. मांत्रिकांना विसावा हिस्सा द्यावा लागतो. उरलेले सारे मोती त्यांचे त्यांनाच ठेवतां येतात. अर्थात्च ते चांगला पैका कमावतात. मोत्यांचा हंगाम संपला म्हणजे आपलीं जहाजें हाकारून ते तीनशें मैल दूर असलेल्या दुसऱ्या एका समुद्रांत जातात; आणि सप्टेंबर व आक्टोबर या दोन महिन्यांत तेथें मोत्याचे शिंपले काढतात. राजाला दहावा हिस्सा द्यावा लागतोच. पण शिवाय चांगले चांगले पाणीदार मोती त्यानें पहिल्यानें निवडून घ्यावे, आणि बाकीचा माल व्यापाऱ्यांच्या हवालीं करावा, अशीही पद्धति असते. मात्र, या निराळ्या मोत्यांची राजा भरपूर किंमत देतो, म्हणून व्यापाऱ्यांची चांगली चंगळ होते.

या देशांतील लोक, एक लंगोटी सोडली तर, अंगावर दुसरें कसलेंही वस्त्र घेत नाहींत. राजासुद्धां, असाच अर्धनग्न असतो. फक्त फरक इतकाच कीं, त्यानें कमरेला गुंडाळलेलें वस्त्र भरजरीचें असतें! एरवीं राजाचा डौल मात्र फार मोठा असतो. हिरे, माणकें, लालड्या, पांचू, रत्नें, यांनीं लकटलेले नाना प्रकारचे दागिने राजाने घातलेंले असतात. १०८ मोत्यांचा आणि माणकांचा छातीवर रुळणारा एक कंठा राजा नेहमीं घालतो. असें सांगतात कीं, जप करावयास या मण्यांचा त्याला उपयोग होतो. प्रत्येक हातांत, राजा सोन्याचीं तीन सलकडीं घालतो; आणि या कड्यांवर भारी किंमतींचें जडावाचें काम केलेलें असतें. प्रत्येक पायालाही कंबरपट्यासारखे सोन्याचे पट्टे घातलेले असतात; आणि यावरही नाना प्रकारची मूल्यवान् रत्नें बसविलेलीं असतात. हाताच्या आणि पायाच्या बोटांत सोन्याच्या आणि हिऱ्यामाणकांच्या अंगठ्या घातलेल्या असतात. या सर्व अलंकारांनीं नटलेला राजा मोठ्या डौलानें इकडे तिकडे वावरत असतो. मुख्य म्हणजे, हीं सर्व रत्नें आपल्याच राज्यांत सांपडलेलीं आहेत या गोष्टीचा त्याला फारच अभिमान वाटतो.

राजाला कमीत कमी पांचशें राण्या आणि उपस्त्रिया आहेत. एकादी विशेष सुंदर स्त्री त्याला दिसली आणि तिच्यावर जर त्याची वासना गेली तर तो ती खुशाल घेतो. एकदां तर राजानें आपल्या भावाची बायकोच जवळ केली; आणि प्रसंगाकडे लक्ष देऊन, त्या बाईनेंही जिवाचा उगाच कहार करून घेतला नाहीं. राजाच्या पदरीं अनेक मानकरी असतात. इहलोकीं, आणि परलोकीं, यांनीं राजाची सेवा करावयाची असते. राजा जेथें जाईल तेथें त्यांनाही जावें लागतें. राजा मरण पावला, आणि त्याची चिता पेटली, म्हणजे हे सगळे मानकरीही

त्या चितेंत प्रवेश करतात; कारण, परलोकींही आपण त्याच्या सेवेला रुजू व्हावें अशी त्यांची इच्छा असते. मुलगा गादीवर आला म्हणजे तो बापाच्या संपत्तीला हात लावीत नाहीं. ती संपत्ती घेणें म्हणजे आपल्याला स्वतंत्र कांहीं मिळवितां येत नाहीं, असें दाखविण्यासारखें ठरेल म्हणून ही पद्धति राजकुमारांनीं चालू ठेवलेली आहे.

या पद्धतीमुळें राजकुळाच्या खजिन्यांत गडगंज संपत्ती साचत राहते. या देशात घोडा हें जनावर नाही. राजा आणि त्याचे तिघे भाऊ दरसाल पांचहजार घोडे विकत घेतात; आणि परदेशचे व्यापारी खूप गबर बनतात. तांदुळाशिवाय या देशात कांहींच पिकत नाहीं. त्यामुळें, घोड्यांना दाणा मिळत नाहीं, आणि या प्रदेशांतील हवाही त्यांच्या प्रकृतीला मानवत नाहीं. थोड्याशा दिवसांत हे घोडे मरण पावतात. आणि त्यांना होणारीं शिंगरें वेडीं वाकडीं आणि फेंगडीं असतास. अर्थात् नवे नवे घोडे विकत घेणे राजाला भाग पडतें.

येथील स्त्री-पुरुष दिवसांतून दोनदा स्नान करतात. आणि स्नान केल्याशिवाय तोंडात अन्न घालीत नाहींत. पारोशानें जेवणाराला पाखंडी समजतात. जेवतांना ते डावा हात कशालाही लावीत नाहींत. स्वच्छ आणि नाजूक कामे ते उजव्या हातानें करतात; आणि अस्वच्छ, व घाणेरड्या कामाला डावा हात राखून ठेवतात. पाणी पिण्याचें ज्याचें त्याचें भांडें निराळें असतें; आणि एकाचें उष्टें भांडें दुसरा कधीं घेत नाहीं. मद्य पितांना मद्याचें भांडे ते ओठाला लावीत नाहींत. उंचावरून तें घशात ओततात. कोणी पाहुणा आला, आणि त्याचें भांडें जर त्याच्यापाशीं नसलें, तर मद्य त्याच्या ओंजळींत ओततात, आणि तो तें पितो.

ऋणकोनें जर पैसे लवकर परत दिले नाहींत, तर धनको त्याच्या भोंवतीं एक रेघ ओढतो आणि निघून जातो. या रेघेच्या बाहेर जाणें, अत्यंत खोटें काम समजतात. शेवटीं, कर्ज फेडण्याची कांहीं तरी व्यवस्था करूनच देणेकऱ्याला आपली सुटका करून घ्यावी लागते. एकदां राजावरच असा प्रसंग आला. व्यापारी लोकांचें कांहीं देणें राजा लागत होता. त्यांनीं पुष्कळ आर्जवे केलीं; पण राजा पैसे देईना. शेवटीं कंटाळून जाऊन, राजा एकदां घोड्यावरून चालला असतांना, या व्यापाऱ्यांनीं त्याच्या भोंवतीं रेघ ओढली. त्याबरोबर राजा ताडकन् उभा राहिला. रेघ ओलांडून तो पुढे जाईना. कर्ज-फेडीची व्यवस्था त्यानें केला, आणि मगच तो तेथून हलला.

हे लोक द्राक्षासव पीत नाहींत. एकादा कोणी पिणारा असला, तर न्यायमंदिरांत त्याच्या साक्षीला कसलीही किंमत देत नाहींत. समुद्र-यान करणारांना सुद्धा येथें कसलीही किंमत नसते, आणि न्यायमंदिरांत समुद्रयान करणारांची साक्ष चालत नाहीं. मात्र, एकाद्यानें कसलीही बदफैली केली, तरी त्याच्याकडे हे दुर्लक्ष करतात.

या मलबार प्रांतांतच, तो थोर हुतात्मा प्रेषित संत थॉमस् याची समाधी आहे. या समाधीच्या यात्रेला हजारो ख्रिस्ती लोक आणि सॅरसिन्स जातात. या संताची एक मोठी चमत्कारिक कथा या बाजूला प्रचलित आहे. इ. स. १२८८ तील ही गोष्ट आहे. एकदां एका मोठ्या जमिनदारानें आपल्या शेतांतील भात गोळा केलें. तें सांचवून ठेवावयास पुरेशी जागा नव्हती म्हणून, त्यानें सेंट थॉमसच्या प्रार्थना-मंदिरांत तें भरून ठेवले. थॉमसचे अनुयायी म्हणूं लागले " आमचें हें प्रार्थना-मंदिर आहे; आणि गावोगांवचे येणारे यात्रेकरूही या देवळांतच

उतरतात; तर तुम्हीं आपलें भात काढून ध्यावें." परंतु जमीनदार बिलकूल ऐकेना. दुसऱ्या दिवशीं रात्रीं जमीनदाराला स्वप्न पडलें. त्याला वाटलें की, सेंट थॉमस् हा अतिशय संतापून आपल्यापुढें उभा आहे. आणि आपल्या हातांतील त्रिशूळ त्यानें आपल्या गळयावर रोखला आहे. थॉमस म्हणाला, ' जर तूं आपलें धान्य काढून नेलें नाहींस, तर तुला कुत्र्याचें मरण येईल. ' जमीनदार खडबडून जागा झाला आणि त्यानें थॉमसचें देऊळ एकदम रिकामें केलें. पडलेलें स्वप्नही त्यानें लोकांना सांगितलें. तेव्हांपासून थॉमसची कीर्ति सगळीकडे पसरली. परंतु, या संताला मरण मात्र चमत्कारिक आलें. एके दिवशीं तो आपल्या आश्रमांत डोळे मिटून प्रार्थना करीत होता. आश्रमाच्या बागेंत मोर हिंडत होते. पलीकडून जाणाऱ्या एका शिकाऱ्यानें मोराला तीर मारला. पण तो मोराला न लागतां या साधुपुरुषाला मात्र लागला. मरण जवळ आलें हें ओळखून, त्यानें परमेश्वराची प्रार्थना केली; आणि मला आता पदरीं घे असे म्हणून त्यानें प्राण सोडला. त्याच्या समाधीची पूजा लोक भक्तिभावें करतात; आणि त्याला ज्या ठिकाणीं बाण लागला, त्या ठिकाणची तांबडी माती ते अंगारा म्हणून बरोबर नेतात. कोणी आजारीं असलें तर, ही माती कालवून ते त्याला प्यायला देतात; आणि आजाऱ्यांना गुणही येतो.

कोपली ( म्हणजे केपकामोरिन ) या प्रांन्तांतून ध्रुवाचा तारा क्षितिजापासून एक हात उंचावर दिसतो. जिकडे तिकडे रानेंच रानें पसरलेली आहेत, आणि त्यांत वन्यपशु हिंडत असतात. येथें कांही वानरें दिसतात, तीं येवढीं मोठीं असतात, आणि त्यांचे नाकडोळे असे दिसतात कीं, माणसांत आणि त्यांच्यांत फारशी तफावत वाटत नाहीं. दुसरीं लांब शेपटयांचीं नेहमींचीं माकडें येथें दिसतातच. पण तीं आणि हीं अगदीं निराळीं असतात."

मार्को पोलोच्या वर्णनावरून असें दिसतें कीं, फार झालें तर, भारताच्या अगदीं दक्षिण टोंकाला मलबार प्रांतांत तो आलेला असावा. त्याने ठिकठिकाणीं लिहिलेलें आहे कीं, " या प्रांताच्या पश्चिमेला तीनशें मैल गेलें, पूर्वेला पांचशें मैल गेलें म्हणजे अमूक प्रांत लागतो. " परंतु या त्याच्या उल्लेखांचा कांहीं बोध होत नाहीं. आणि या प्रांतांचीं त्यानें जीं वर्णनें केलीं आहेत, तीं इतकीं सामान्य स्वरूपाचीं आणि ढोबळ आहेत कीं, हे प्रांत त्यानें प्रत्यक्ष पाहिले होते, असें बिलकूल वाटत नाहीं. झालें असेल तें हें कीं, मार्को पोलो मलबार प्रांतांत येऊन राहिला असेल, आणि तेथें त्याच्या कानांवर आलेल्या प्रांतोप्रांतींच्या हकीकती त्याने लिहून ठेवल्या असतील. त्यानें लिहिलेल्या प्रवासवृत्तांवर तेव्हांचे लोक विश्वास ठेवीनात असें मागें सांगितलेलेंच आहे. परंतु, भारताच्या दक्षिण भागांतील प्रदेशांचीं त्याने जीं वर्णनें लिहिलीं आहेत, तीं पाहिलीं म्हणजे विश्वास न ठेवणाऱ्या लोकांचें विशेष कांहीं चुकलें होतें असें वाटत नाहीं. मार्को पोलोनें प्रवास केला असेल हें खरें, आणि म्हणून त्याची मुख्य हकीकत आपण खरी मानावी. पण त्यानें जी नाना प्रकारची अंधुक स्वरूपाची माहिती दिली आहे, ती खरी मानणें बरोबर होणार नाहीं. तो म्हणतो—

" कार्मोदिन, कानान, कबाया, गुजराथ अशासारख्या देशांची हकीकतही आपल्याला ऐकावयास मिळेल. हजारों मैलांचा समुद्र—प्रवास केला म्हणजे आपण मादागास्कर बेटांत जातों. येथें दरवर्षी अमूक एका ऋतूंत प्रचंड आकाराचे पक्षी येऊन दाखल होतात. यांचें नांव रु क् असें आहे. ते गरुडासारखे दिसतात. पण गरुडाच्या मानानें फारच मोठे असतात. हे इतके बळकट असतात कीं, ते आपल्या नख्यांनीं हत्तीला सुद्धां उचलतात. उंच हवेंत नेऊन ते तेथून त्याला खालीं सोडतात. हत्ती आपटून मरून जातो. आणि मग त्याच्या मांसावर हे यथेच्छ ताव

मारतात. ज्यांनी हे पक्षी पाहिले आहेत ते सांगतात कीं, यांनीं पंख



पसरले म्हणजे हे सोळासोळा हात लांब भरतात. येथून पुढें झांझिबार बेटांत जातां येतें. पुढें आबास्सिया म्हणजे अॅबिसिनिया देश लागतो. होतां होतां आपण कॉन्स्टँटिनोपलला जाऊन पोहोंचतों; काळ्या समुद्राच्या वर, रशियांत वस्ती आहे. पण तिकडल्या प्रांताला अंधार–देश असें नांव आहे. कॉन्स्टँटिनोपलहून आम्हीं व्हेनिसाला गेलों."

# कोलंबस

सुमारें साडे चारशें वर्षांपूर्वीपर्यंत, युरोपियन लोकांना अटलांटिक महासागराचे फार भय वाटत असे. इंग्लंड, हॉलंड, फ्रान्स येथून निघालेले दर्यावर्दी दक्षिणेकडे जाऊन, भूमध्य समुद्रांत तरी शिरत; किंवा आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें आणखी थोडें खालीं जाऊन, उष्ण हवेचा टापू लागतांच, परत फिरत. तथापि, याच्याही पूर्वी आफ्रिकेच्या दक्षिण टोकाला वळसा घालून, एकादा दर्यावर्दी तरी, हिंदी महासागरांत उतरलेला असल्याची नोंद इतिहासांत आहे. पण युरोपांतून, थेट पश्चिमेकडे जाऊन, अटलांटिक महासागरावर सफर करण्याची छाती मात्र कोणीही केलेली नव्हती. कोणी कोणी नाविक सांगत असत कीं, हा समुद्र ओलांडला म्हणजे, पलीकडे एक मोठी विशाल भूमि आहे; व या समुद्रांत अनेक बारीक सारीक बेटेंही आहेत. परंतु नाविकांच्या या सांगण्यावर विश्वास ठेवून कोणींही आपलीं जहाजें त्या अंगाला नेलीं नाहींत. याचें एक प्रमुख कारण असें कीं, या अटलांटिक महासागरावर, सध्यां सुद्धां बारीक तिमिर पसरलेलें असतें; अनेकदां जिकडे तिकडे धुकें भरलेलें असतें; आणि दर्याही पुष्कळदां खवळलेला असतो. अर्थात् तेव्हां तर लोकांचा असा समज होता कीं, या समुद्रांत पुढें पुढें जाण्याचें साहस जे कोणी करतील ते सैता-

नाऱ्या मुलुखांत जाऊन दाखल होतील. हा समाज पांच शतकापूर्वीपर्यंत लोकांच्या मनांत गच्च बसलेला होता.

युरोपांतील व्यापार आशिया मायनर, इराण, अफगाणिस्थान या वाटेनें हिंदुस्थान व आशियांतील इतर देश याच्याशी चालू असे. हाच मोठा हमरस्ता होता. परंतु, या प्रदेशातील तुर्कांचें आणि युरोपियनांचें वाकडे आल्यामुळे, त्यांनीं व्यापाराची ही वाट बंद करून टाकली. तुंबलेला व्यापार कोणीकडून चालू करावा, अशा विवंचनेंत युरोपांतील व्यापारी राष्ट्रें पडलीं. आणि मग, युरोपाच्या उत्तरेकडून, आफ्रिकेच्या दक्षिणेकडून, असा कोठून तरी, दर्यावरचा नवा मार्ग शोधून काढण्याच्या उद्योगाला हॉलंड, इंग्लंड, स्पेन येथील नावाडी लोक लागले. युरोपच्या उत्तरेकडून जाणे हें बर्फा-मुळें तेव्हाच्या दिवसांत, सर्वथा अशक्य ठरले. आणि आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें बरेच खालीं गेल्यावर, उन्हाचा कहर सुरूं होत असल्यामुळें, पुढे गेल्यास, आपण नरकपुरींत जाऊन पोहचूं, असा धाक त्याना वाटूं लागला. अशा प्रकारें, पूर्व दिशेकडे जाण्याचा प्रश्न कुचंबून पडला. दर-म्यान् तेव्हाच्या सशोधकानीं असा एक सिद्धांत माडला होता कीं, पृथ्वी गोल असली पाहिजे. हा सिद्धान्त फार थोड्या शहाण्या लोकाना पटलेला होता. आणि या शहाण्या लोकांतच कोलंबसाची गणना करावयास हवी.

पृथ्वी गोल आहे हें मत तर त्याला पसंत झालेंच होतें. पण तो येव-ढ्यावरच थाबला नाहीं. पुढें जाऊन त्यानें असें अनुमान बांधलें कीं, जर पृथ्वी गोल आहे तर, पश्चिम दिशेनेंच पुढें पुढें गेलें असतां, आपण पूर्व दिशेला जाऊन पोहचूं. पूर्व, उत्तर आणि दक्षिण या दिशांनीं मार्ग काढणें अशक्य झालेले होते; पश्चिम दिशा तेवढी रिकामी राहिलेली होती. पृथ्वी गोल आहे, अशी कोलंबसची पक्की खात्री असल्याहूळें या बाजूनेंच पूर्व दिशेला जाण्याचा मार्ग शोधून काढावा असें त्यानें ठरविलें.

हिंदुस्थानकडे कां जावयाचें याचें, इतर लोकाचें आणि कोलंबसाचें उत्तर मात्र एकच नव्हतें. इतर बहुतेक सारे लोक म्हणत कीं, हिंदुस्थानां-तील आणि आशिया खंडांतील बाजारांत आपला माल नेऊन मांडता यावा, आणि तिकडील मसाले युरोपांत परत आणता यावें यासाठीं हा नवा मार्ग पाहिजे आहे.

कोलंबसाचें मत मात्र निराळें होते. त्याला वाटे कीं, पूर्वेकडील देशांत जावें, पुष्कळ पैसा संपादन करावा, आणि हा पैसा मुसलमान लोकांचें आक्रमण युरोपवर होत होते तें बंद पाडण्याच्या कामीं खर्च करावा. म्हणजे त्याच्या मतानें पूर्वेकडे जाणें हें एक धर्मकार्य होतें. शिवाय बायबलांत सांगितलें आहे कीं, 'पृथ्वीवरील लोक जवळ जवळ येतील.' कोलंबसाला वाटलें कीं, आपण तिकडे गेलों म्हणजे भाकित केलेली ही जवळीक आपोआपच उत्पन्न होईल, आणि पूर्वेकडील लोक आपल्या धर्माची दीक्षा घेतील. अशा कल्पनांनी प्रेरित होऊन, कोलंबसानें आपली जहाजें अटलांटिक महासागरांत हाकारली. परंतु, हा कोलंबस, कोण, कोठला, हें पाहिल्यानें सांगितलें पाहिजे.

इटलींतील जिनोआ गांवीं इ. स. १४३५ त कोलंबस जन्माला आला. याचे आईबाप गरीबच होते. पण घराणें चागलें कुलवंतांचें होतें. कोलंबसला दोन भाऊ आणि एक बहीण अशीं तीन मावंडें होतीं. आपला वडील मुलगा कोलंबस हा लवकर शहाणा झाला पाहिजे अशा हिशेबानें, बापानें फार लहानपणींच त्याला शिकवावयास आरंभ केला. बुद्धीनें चलाख असल्यामुळें, त्याला सर्वच विषय चांगले येत. परंतु, बापाच्या हें ध्यानांत आलें कीं, या पोराला भूगोलाची माहिती फार आवडते. त्याचें रहाणें समुद्रकाठाच्या जवळ असल्यामुळें, कोलंबसाला वाटूं लागलें कीं, आपण नावाडी बनावें. मुलाचा हा कल पाहून, बापानें त्याला नावाडपणाचें शिक्षण

देण्याचें ठरविलें. प्याभिआ येथें एका शाळेंत हें शिक्षण देत असत. भूमिति, भूगोलविद्या, खगोलविद्या, आणि नावाडीपण हे विषय कोलंबस तेथें आवडीनें शिकूं लागला. मास्तरसाहेबांचें एकंदर ज्ञान बेताचेंच होतें. त्यांची पुंजी संपल्याबरोबर दुसऱ्या कोठल्या शाळेंत न जातां, कोलंबस एकदम समुद्रावर गेला; आणि कोलंबो या नांवाच्या एका नातेवाईक खलाशाच्या हाताखालीं नोकरीला राहिला. तो या वेळीं केवळ चौदा वर्षांचा होता !

भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यावर यावेळी अनेक लहान लहान सज्यें होतीं. आणि प्रत्येक राजाचे एक लहानसें आरमारही असें. परंतु ठिकठिकाणीं, कांहीं साहसी लोकांनीं जवळ बरीचशीं तरांडीं बाळगून, राजांच्या आरमाराला न जुमानता, समुद्रावर वाटमारीचा धंदा बेधडक चालयिला होता. या बिलंदर चाचे लोकांतही कोलंबो हा सवाई बिलंदर म्हणून प्रसिद्ध असे, आणि यांच्या हाताखालींच कोलंबस समुद्रावर भटक्या मारावयास शिकला. थोड्याशा सरावानें त्याची पाण्याची भीती पार मरून गेली. इ. स. १४४९ साली राजानें नेपल्स शहर हस्तगत करण्यासाठीं तयार केलेल्या आरमारांतील एक ताफा कोलंबोच्या हवालीं केला. समुद्रावरची ही लढाई चार वर्षें चाललेली होती. आणि कोलंबस ४ वर्षें पर्यंत, दर्यावरच नांदत होता. एकही साहस असे नसेल कीं, जें त्यानें आचरिलें नाहीं. अटलांटिक महासागराच्या अंधाऱ्या हवेंतून जहाजें हाकारीत नेणें, हें धैर्याचें काम त्याने पुढें केलें. पण, त्या धैर्याचा पाया या चार वर्षांत कोलंबसानें भरला. तो मनानें आणि शरीरानें विलक्षण बळकट बनला. इतक्यांत कोलंबो मरण पावला. आणि त्याचा पुतण्या धाकटा कोलंबो हा त्याच्या जागेवर आला. हा कोलंबो मोठा निर्दय आणि आडदांड असे.

एकदां असें झालें कीं, व्हेनिसवाल्यांची कांहीं जहाजें परत आपल्या

देशाकडे चाललीं होतीं. आणि जहाजांवर उंची माल भरलेला होता. पोर्तुगालच्या किनाऱ्याने ही जहाजें चालली असता, कोलंबो आणि कोलंबस या दोघांनी त्या जहाजांवर हल्ला चढविला. जहाजावरचे लोक यांच्या-सारखेच महा रगेल होते. युद्धाची झुंबड सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारखी चालली होती. दोन्हीं जहाजांवरची कित्येक माणसे मेलीं. होता होता, कोलंबस ज्या जहाजांवर होता, तें एकाएकीं पेटलें. शत्रूंच्या जहा-जावर उड्या टाकतां याव्या म्हणून, कोलंबोनें आपली शहाजें शत्रूंच्या जहाजाना साखळदंडांनीं बांधून टाकलीं होतीं. यामुळें दोघांचींही आरमारें पेटलीं. जीव वाचवावयाचा तर समुद्रात उड्या टाकल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कोलंबसानेंही उडी टाकली; आणि सहज हाताला लागलेल्या एका फळकुटाला धरून, सहा मैलपर्यंत, पोहत जाऊन तो पोर्तुगालच्या किनाऱ्याला लागला.

यावेळीं पोर्तुगालच्या गादीवर प्रिन्स हेन्सी या नावाचा राजा होता.



हा राजा मोठा आकांक्षी आणि साहसी होता. मूर लोकांच्याशीं भांडतां

भांडतां, आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें तो पुष्कळच खालपर्यंत गेलेला होता. तेव्हां त्यानें अटकळ बांधली होती कीं, आफ्रिकेला वळसा घालतां येईल; आणि मग तेथून पुढें गेल्यावर, हिंदुस्थानालाही पोंचतां येईल. उष्ण कटिबंधांत शिरले असतां, जळून मरण्याची भीति तो खोटी मानत असे. राजाच्या या अनुमानामुळें साहसी नावाडी लोकाना मोठाच उत्साह प्राप्त झाला होता; आणि ज्याच्या त्याच्या तोंडीं दूर दर्यावर जाण्याची



गोष्ट चालू होती. याच वेळीं, म्हणजे इ. स. १४०० सुमारास कोलंबस पोहत पोहत पोर्तुगालच्या किनाऱ्याला लागला.

लिस्बन येथें असतांना, समुद्रावरच्या सफरींचा हा घोष त्याच्या कानावर सारखा पडत होता. सफरींतील साहसांची आवड, एवढा एकच विषय त्याला अजून तरी दिसत असे. परंतु आतां प्रिन्स हेन्रीच्या भूगोल–विषयक

कल्पना त्याने ऐकल्या. तेव्हा त्याच्या प्रतिभाशाली मनात चमत्कारिक वादळे उठूं लागलीं; आणि या वादळांना कांहीं आकार यावयास एक निराळेच कारण झाले. कोलंबस रोज देवळांत प्रार्थनेला जात असे. या देवळाच्या शेजारींच डोना फिनिया या नावाची एक मोठी प्रतिष्ठित व उच्चं काळांतील स्त्री राहत असे. तिचे मन कोलंबसावर बसलें. लवकरच शुभमंगल होऊन सासूबाईनी कोलंबसाला घरजावई करून घेतले ! कोलंबसाची काठी सडक उंच असून तो चांगला बांधेसूद आणि पिळदार होता. त्याचा चेहरा थोडासा लांबट असून नाक चोंचदार व डोळे घार असत. डोळ्यांचीं भिंगे स्वच्छ लखलखित होतीं; आणि त्याची चालण्याची ढब विशेष ऐटदार होती. अशा या पुरुषावर, त्या स्त्रीचें मन बसावें, यात कांहींच नवल नाहीं. परंतु, तो घरजावई बनला, याचा मात्र त्याच्या भावी जीवितावर फारच मोठा परिणाम झाला. सासरा वारलेलाच होता. पण तो जिवंत असताना, त्याने अनेक सफरी केलेल्या होत्या, आणि त्या सफरींचे नकाशे त्यानें तयार करून ठेवले होते. सासूने हे सारे साहित्य जावयाच्या हवालीं केलें; येवढेच नव्हें तर, नवऱ्याच्या तोंडून ऐकलेल्या समुद्रावरच्या नाना प्रकारच्या गोष्टी ती त्याला नित्य सांगूं लागली. नकाशे पाहून कोलंबसची नजर फांकली; आणि गोष्टी ऐकून त्याचें साहस पुन्हां जागें झाले. सफरीवर जाणाऱ्या लोकांना नकाशे लागत, म्हणून हातीं असलेल्या नकाशांच्या नकला करण्याचे काम त्यानें सुरू केले; आणि समुद्रावरून नव्याने जाऊन आलेल्या लोकांच्या तोंडून जर कांहीं नवी माहिती मिळाली, तर ती त्यानें नकाशांत दाखविण्याची पद्धत ठेवली. स्वाभाविकच कोणाही नावाड्यापेक्षा, आता त्याला समुद्राची माहिती जास्त झाली. पूर्वीं होऊन गेलेल्या भूगोलकारानीं लिहिलेले ग्रंथ त्यानें वाचून काढले; आणि त्यानीं दिलेली माहिती आधुनिकांच्या माहितीशी कोठें जुळतें व कोठें जुळत नाहीं,

हे त्याने ताडून पाहिलें. वर सांगितलेच आहे कीं, आफ्रिकेच्या दक्षिण टोकाला वळसा घालून, पूर्वेकडे जाता येईल, या एकाच विचाराने सारे नावाडी देश भरून गेले होते. पण उष्ण कटिबंधातून दक्षिणेकडे जाणे फार धोक्याचे आहे, ही भीति मात्र निरस्त झालेली नव्हती. अशा वेळी कोलंबसाच्या मनात विचार आला कीं, 'ज्याने उठावे त्यानें दक्षिणेकडेच जाण्याची कल्पना का करावी ? युरोपच्या उत्तरेकडून जाता येत नाही, कारण तिकडे बर्फ फार आहे; आणि आफ्रिकेला वळसा घालून जातां येत नाहीं, कारण वाटेंतच आपण भाजून मरूं अशी भीति लोकांना वाटत आहे. मग आपण पश्चिमेकडूनच का जाऊं नये ! जर पृथ्वी गोल आहे, तर पश्चिमेकडे पुढे जाता जाता, पूर्वेकडे असलेल्या हिंदुस्थान देशांत आपण केव्हाना केव्हा तरी पोहचूंच.'

या कल्पनेनें कोलंबसाचें मन अगदी भरून गेलें. फ्लोरेन्स शहरचा भूगोलवेत्ता पेलो टास्कानेली याजबरोबर त्याने पत्रव्यवहार चालू केला. कारण, हीच कल्पना या पंडितांच्या मनातही बरेच दिवस घोळत होती. पृथ्वी वाटोळी असून पूर्वेकडून पश्चिमेस व पश्चिमेकडून पूर्वेस आपोआपच जाता आलें पाहिजे असा त्याचा सिद्धांत होता आणि पूर्वेकडे पसरलेलें आशिया खंड पसरत पसरत युरोपच्या पश्चिमेस थोडासाच समुद्रमध्यें रहाण्याइतकें पसरलें असावें असा त्याचा अंदाज होता. आशिया खंडाचा पूर्व किनारा व युरोपचा पश्चिम किनारा याच्यामधील अन्तर फार थोडें असलें पाहिजे अशी त्याची कल्पना होती. कारण पृथ्वीचा परीघ आहे त्याहून फार लहान असावा अशी त्याची अटकळ होती. युरोपच्या पश्चिमेला पसरलेला विस्तीर्ण अटलांटिक महासागर, त्याच्या पलीकडे अमेरिका हें अेक महाद्वीप, आणि त्याच्या पलीकडे पॅसिफिक नांवानें ओळखला जाणारा अफाट महासागर, इतकें झाल्यावर मग आशिया खंडाचा

पूर्व किनारा लागतो हें तेव्हां कोणालाच माहीत नव्हतें. या पोलो टास्का-नेलीने आपलें हें मत कोलंबसाला कळविले आणि बरोबर अेक नकाशाहि काढून दिला. नकाशा पाहून कोलंबसाची खात्री झाली कीं, युरोप व आशिया यांच्यामधील नकाशात दाखविलेले थोडेसें अन्तर आपण जर धाडस करून ओलांडलें तर आपण आशियांत व मग हिंदुस्थानांत जाअूं शकूं. हें त्याचें ठाम मत झाले. मार्को पोलो, अल्फिगॅनस इत्यादींची मतेंहि त्यानें शोधून पाहिलीं. ॲरिस्टॉट्ल्, सेनेका, प्लिनी इत्यादिकांच्या मताचा कानोसाहि त्यानें घेतला आणि पश्चिमेकडे चालूं लागलें असता आपल्याला पूर्वेकडील हिंदुस्थानात जाअून पोहोचतां येईल हे आपले मत त्यानें कायम केले.

अेकीकडे शास्त्रवेत्त्यांची मते पहात असताना दुसरीकडे खलाशी लोक काय बोलतात याकडेहि त्याचे लक्ष होते. मदिरा लिओनामा नांवाचा हा खलाशी सांगत असे कीं, पश्चिमेकडे तीन चारशें मैल गेलों असतां तेथें आपल्याला काही बेटे दिसलीं. आयर्लंडचा अेक खलाशी सांगत असे कीं पश्चिमेकडे दूरवर गेलों असतां आपल्याला तार्तरी देशाचा किनारा दिसूं लागला होता. कोणी कोणी सांगत कीं, पश्चिमेच्या बाजूला एक हजार मैल सफर केल्यावर समुद्रावर पश्चिमेकडे वाहात येणारीं कोरीव लांकडें आपण पाहिलीं. कोणी म्हणत कीं, आपल्याला ताजे ऊस सुद्धां दिसले आणि कोणी निर्वाळा देत कीं, आपल्याला चमत्कारिक रंगाची काळी माणसें भर समुद्रांत भेटलीं होतीं. या बातम्यांचा अुपयोग किती करून घ्यावयाचा याची अटकळ कोलंबसाला अर्थातच होती. पण, ' पुढें पृथ्वीची दोन टोकें एकत्र येतील व माणसें आपापलीं राष्ट्रें, भाषा इत्यादि विसरून ' तारकाच्या ' निशाणाखालीं गोळा होतील हें बायबलांतील वाक्य कोलंबसाच्या श्रद्धाळू मनाला फारच पटलेलें होतें. अशा प्रकारें शास्त्र-

सिद्धांत, अनुभवी लोकांनीं सांगितलेल्या कथा, आणि धर्म ग्रंथानें केलेलें भाकित हीं सर्व जमेस धरून कोलंबस आपल्या प्रयोगाला लागला.

यावेळीं पोर्तुगाल देशाच्या गादीवर, मागें सांगितलेल्या हेन्रीचा नातू जॉन हा होता. आजाप्रमाणे त्यालाहि भूमि–शोधाचा मोठा नाद असे. त्याने एक ॲस्ट्रीलेन या नांवाचे नौकानयनास अत्यंत उपयोगी असें साधन तयार केले होते. या राजाकडे कोलंबस गेला. त्याच्या म्हणण्याचा निकाल करण्यासाठी राजाने एक समिति नेमली. या समितीचें कांहीं सभासद मूर्ख होते आणि काही मत्सरी होते. त्यांनी राजाला कळविलें की कोलंबस हा एक भ्रातिष्ट मनुष्य आहे. परंतु तेवढयानें राजाचें समाधान होईना; म्हणून त्यांनी एक निराळीच शक्कल काढली. त्यांनी राजाला सुचविलें कीं ज्या दिशेनें गेलों असता नवी भूमि सापडेल असें हा म्हणतो त्या दिशेला आपणच आपली माणसें धाडावीं म्हणजे नवी भूमि शोधून काढल्याचे श्रेय तरी राजेसाहेबांना लाभेल. या गोष्टीला राजानें होकार दिला. समितीनें कांहीं थोडयाशा नावाड्यांना मारून मुटकून भूमि–शोधाच्या या कामगिरीला धाडलें. परंतु या नावाडयांना स्वतःला ज्ञानहि नव्हते आणि आकांक्षाहि नव्हती. समुद्रावर कांहीं दिवस घालवून ते रडत घरीं परत आले; आणि सांगू लागले कीं तुम्ही पश्चिमेकडे वाटेल तितके जा, जमिन म्हणून कोठें सापडत नाहीं; हा कोलंबस कोणी तरी उपरा आणि पैसे उपटावयास निघालेला माणूस दिसतो. नावाडयांचें मत प्रमाण मानून राजानें कोलंबसाला निरोप दिला. हा सारा लबाडीचा प्रकार कळून आल्यावर कोलंबसाला राजाविषयीं तिरस्कार वाटूं लागला. दरम्यान त्याची बायकोहि वारली. खर्चाचे नीट निभेना; अशा स्थितींत त्यानें पोर्तुगाल देशाला रामराम ठोकला. कोणी म्हणतात कीं सावकाराचें तोंड चुकविण्यासाठीं त्यानें पोर्तुगाल देशांतून यःपलाय केलें.

तेथून तो जिनोआ शहराच्या राजाकडे गेला. पण तो म्हणाला, ' माझें राज्य केवढें आणि मी तुम्हांला देणार काय ? ' येथेंहि निराशा झाल्यावर आपला धाकटा भाऊ बार्थोलोनो याला कोलंबसाने इंग्लंडच्या सातव्या हेन्रीकडे धाडले. चार ठिकाणी खडा टाकून पहावा, जेथे लागेल तेथें लागेल अशा हिशेबाने भावाला तिकडे पाठवून तो स्वतः स्पेन देशांत गेला. यावेळीं त्याची स्थिती अत्यंत हलाखीची होती. अंगावर नीट कपडा नाहीं आणि खिशांत दमडा नाहीं अशा स्थितींत तो आपल्या मेव्हण्याच्या गांवाकडे निघाला. वाटेंत एका धर्मोपदेशकाची आणि त्याची गांठ पडली आणि त्यानें कोलंबसाचें म्हणणें आस्थेनें ऐकून घेतलें. बरोबर एक ओळखीचें पत्र देऊन त्यानें कोलंबसाला आलोंझो पिंझो या नांवाच्या एका दर्यासारंगाकडे पाठविलें. त्याने कोलंबसाशीं बोलणें चालणें केलें आणि त्याची शिफारस करून त्याला राजदरबाराकडे रवाना केलें.

हा राजधानींत जाऊन पोहोंचतो तों त्याला तेथें मोठा गोंधळच सुरू झालेला दिसला. राजा फर्डिनंड हा मूर लोकांशीं युद्ध सुरू करणार होता. म्हणून जिकडे तिकडे दंगल माजून राहिली होती. फर्डिनंड राजा आणि इसाबेल राणी हीं फार चांगलीं माणसें होतीं. पण यावेळीं कामें फार असल्यामुळें कोलंबसाच्या बोलण्याकडे लक्ष द्यावयास त्यांना वेळ सांपडेना. कोलंबस अगदीं रकमेस आला होता. जवळ पैसा नाहीं, धंदा नाहीं अशी त्याची स्थिती झाली होती. इतक्यांत नशिबानें त्याला निराळ्याच बाजूनें हात दिला. कोलंबस फार सुस्वरूप होता. त्याची मुद्रा कांतिमान आणि भव्य असे. ती पाहून अेक श्रीमंत तरुण विधवा स्त्री त्याच्यावर लुब्ध झाली आणि लग्नाची अुठाठेव न करतां तीं दोघें नवराबायको म्हणून खुशाल राहूं लागली. गृहस्थितींत जरी अशा रितीनें फरक पडला तरी कोलंबसाचा मूळचा ध्यास कांहीं सुटला नाहीं. अटलांटिक महासागरांतून पश्चिमे-

कडे जात राहिलें तर आपण शेवटी हिंदुस्थानास जाऊन पोहचूं ही आपली कल्पना तो अनेकाना सांगत राहिला. होतां होता टोलेडो येथील महोपाध्यायाच्या कानीं त्याची हकिगत पडली. हा उपाध्याय फार मोठा विद्वान्, बहुश्रुत आणि चतुर होता. त्याने कोलंबसाला बरोबर घेतलें आणि राजाची व त्याची गांठ घालून दिली. राजा तरी एकटा काय करणार? त्याने विद्वान् लोकांची अेक परिषद बोलाविली आणि या परिषतेत कोलंबसाच्या बोलण्यावर चर्चा सुरू झाली.

परिषदेचे सभासद असेतसेच होते. आपण याची परीक्षा पहावयास जमलों आहोंत असें त्यांना वाटत होतें. कोणी म्हणाले हा पैसाकाढू मागूस आहे, कोणी म्हणाले हा भोळा आणि वेडगळ आहे. तिसरे कोणी म्हणाले हा अन्नाला महाग झालेला असून पोळी पकवावयास पहात आहे. परंतु त्याच्याकडे लक्ष न देता कोलंबसाने आपले म्हणणें परिषदेपुढें माडलें. भौतिकशास्त्रें आणि अध्यात्मविद्या हीं त्या काळीं अेकमेकापासून अलग झालेलीं नव्हतीं. प्रत्यक्षाने जे खरे असेल तेंसुद्धा जर धर्मशास्त्रांशी विसंगत असले तर लोक ते खोटे मानीत. जे बायबलात किंवा त्यावरील भाष्यात असेल तेंच फक्त खरें असे लोक समजत असत. अर्थात् ‘ पृथ्वीचा गोलाकार, गोलाकाराच्या दुसऱ्या बाजूस असणारे प्रतिपादाति (ॲंटिपोडिझ) इत्यादि शब्दप्रयोग येऊं लागले तेव्हा परिषदेंतील सभासद ‘ पाखंड ’ ‘ पाखंड ’ म्हणून गिल्ला करूं लागले. मागें एकदां असाच प्रकार झाला होता. पृथ्वी गोल आहे असे प्रतिपादन कानांवर येतांच सत्पुरुष लाक्तनियस उसळून म्हणाला कीं, ‘ तुम्हीं काय वाटेल तें बोलतां काय! ज्यांच्या पायाचे तळवे आमच्या तळपायांकडे आहेत असें मानव प्राणी पृथ्वीवर आहेत! मग त्यांच्या टांगा जमिनीला चिकटून डोकीं मात्र अुरफाटी लोंबत नसतील काय? पृथ्वीवर असा प्रदेश असेल तरी काय कीं जेथें

अवघ्या वस्तु 'खालीं डोकें वर पाय' अशा आहेत? जेथें झाडांच्या मुळ्या वर भूमींत आहेत? पण फांद्या मात्र खालीं अन्तराळांत लोंबत आहेत? जेथें गारा व पाऊस वर पडतो? खरोखर, या सर्व वेड्या कल्पना दुसऱ्या एका वेड्या कल्पनेतून निघाल्या आहेत आणि ती वेडी कल्पना म्हणजे पृथ्वी गोल आहे असे समजणे ही होय. हे नवमतवादी लोक अगोदर अेक चुकीचें प्रमेय पुढें मांडतात आणि मग त्यांतून असल्या कुकल्पना बाहेर पडतात. लाक्तनिअसचें हे शब्द या परिषदेतील लोकांनीं उद्धृत केले आणि कोलंबसाची थट्टा अुडविली.

कोणी म्हणाले, "ही प्रतिपादातीची कल्पना सर्वथा अग्राह्य होय. ती मानिली तर आदामपासून अवघी मानव जात जन्मली हा बायबल–प्रणीत सिद्धांत खोटा पडतो. जर ते आदामचेच वंशज तर ते तेथें गेले कसे? अेवढा अफाट समुद्र त्यांनीं अुल्लंघिला कसा? अर्थात् मूळात ते नसलेच पाहिजेत." कोणी "मूले कुठारः" या न्यायानें म्हणाले, "अगोदर पृथ्वी गोल आहे हेंच खोटें आहे. कारण बायबलांत स्पष्ट म्हटलें आहे की, हें नीलवर्ण आकाश पृथ्वीवर तंबूप्रमाणें आहे. मग आकाश जर तंबू तर त्याच्या खालची पृथ्वी ही एक विस्तीर्ण सपाट सतरंजीच नव्हे काय?" कोणी म्हणत, "पृथ्वीचा गोलाकार व प्रतिपादातींचे अस्तित्व खरे धरलें तरी हा कोलंबस उष्ण कटिबंधात जाऊन जगणार कसा?" कोणास चिंता पडली कीं, जी सफर निदान तीन वर्षे चालवावी लागणार तींत हा अन्न-पाण्यावांचून मरणार नाही काय? शेवटी अेका चतुर श्रोत्यानें विचारलें कीं, "समजा, तुम्ही हिंदुस्थानास पोंचला, तरी पण पोंचलो म्हणून सांगण्यास तुम्ही परत कसे येणार? तुम्हीच म्हणतां पृथ्वी गोल आहे; अर्थात् इकडून तिकडे जातांना तुम्हांला उतरणच लागेल व सफर सहज होईल; पण तिकडून परत फिरल्यावर तुम्हांस सारखा चढच लागणार. मग या अखंड

चढानें तुम्ही परत कसे येणार ?" हा बिनतोड कोटिक्रम ऐकून तेव्हांचे श्रोते कौतुकानें स्तिमित झाले कीं, आपल्याचपैकीं एकाचें अज्ञान पाहून ओशाळले याची नोंद इतिहासांत नाही ! पण मागे मागें जाऊन प्रस्तुतच्या अत्क्रान्त कल्पनाची वाढ तपासली म्हणजे ज्ञानाची गति किती मंद आहे हे लक्षांत भरून आपल्या बुद्धीस गंभीर्य प्राप्त होते. या गोंधळांतसुद्धां कांहीं अुपाध्याय खरे चिकित्सक होते. त्यानीं त्यांचें म्हणणें खरें आहे असे ठरविलें व त्याप्रमाणें बादशहास कळविलें. पण बहुमत मात्र विरुद्ध होतें.

इकडे पंडितांची चर्चा चालू होती तर राजा तिकडे आपल्याच घाईत होता. अर्थात् कोलंबसाला गप्प बसावें लागलें. पण घरीं बसून तरी काय फायदा ? असें वाटून कोलंबसहि लढाईवर गेला. दोन वर्षांनीं पुन्हा सारें स्थिर स्थावर झाले आणि पुन्हा सभा, पुन्हा चर्चा सुरू झाल्या. तथापि पंडितांचें मत कोलंबसाला अनुकूल पडेना. शेवटी तो अगदीं अंबून गेला आणि त्यानें स्पेनची राजधानी सोडली. कोलंबस राजाच्या दरबारांतून विन्मुख जात आहे हें जॉन पेरे या महाधिकाऱ्याला पसंत पडलें नाही. तो राणीसाहेबांना भेटला आणि म्हणाला की, 'अेवढा थोर संशोधक आपण परत दवडणें बरोबर नाहीं.' पेरेचे म्हणणें राणीला अेकदम पटलें. राणी व राजा हीं दोघेहि राज्याची मालक होतीं आणि म्हणून कोलंबसाला मदत करावी कीं काय हें राजेसाहेबांना विचारण्याची जरूरी तिला नव्हती. माणूस धाडून, परत निघालेल्या त्या कोलंबसाला तिनें बोलावून आणलें आणि दरबारांतून सरबराई झाली नाहीं तर मी माझे दागिने गहाण ठेवीन आणि कोलंबसाच्या सफरीचा खर्च भागवीन असें ती निकरानें बोलली. राजानें रूकार दिला आणि कोलंबसाची तयारी झाली.

राजा आणि कोलंबस यांच्या ठरलेल्या अटी ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत. कोलंबस जे देश आणि समुद्र शोधून काढील तेथील सर्व सत्ता-

धिकार कोलंबसाला असावा व त्याच्या मागून तो त्याच्या कुळांत रहावा; नवीन सांपडलेल्या भूमीवर त्याला राजाचा प्रतिनिधी म्हणून समजण्यांत यावे; त्या देशांत होणारे अुत्पन्न आणि चालणारा व्यापार यांवरील नफ्यापैकीं दहावा हिस्सा कोलंबसाला मिळावा; त्या प्रदेशातील लोकांशीं जर कांही तंटे झाले तर ते तोडण्याचा अधिकार कोलंबसाकडे रहावा; यापुढे आणखी कांहीं सफरी कोलंबसानें केल्या तर लागणाऱ्या खर्चापैकीं आठवा हिस्सा कोलंबसाने द्यावा; पण जर या सफरीतून कांहीं नफा झाला तर त्याचाहि आठवा हिस्सा त्याला मिळावा. इ. स. १४९२ अेप्रिल ता. १७ या दिवशी राजाराणींनीं या करारपत्रकावर सही केली आणि पश्चिमेकडे जातां जातां आशियांतील तार्तरी प्रदेश कोलंबसाला लागेल या समजुतीने त्यांनीं तार्तरीच्या बड्या खानाला पत्र लिहिलें व पेलोस बंदराच्या अधिकाऱ्यांना आज्ञापत्रें धाडलीं कीं, कोलंबसाबरोबर द्यावयाचीं जहाजें आणि पाठवावयाचे खलाशी यांची लवकर तयारी करावी.

गोळा केलेले खलाशी कोलंबसाबरोबर जावयास अगदी नाखूष होते. कारण अटलांटिक महासागर म्हणजे पाताळांत नेअून सोडणारी अेक वाट आहे असा त्यांचा समज होता. पण राजाचीच आज्ञा झाल्यामुळें नाअिलाज होअून ते जावयास तयार झाले. कोलंबसाला स्वतःला सुद्धां आपण परत येअूंच येअूं अशी खात्री नव्हती. म्हणून त्यानें अुपाध्याला बोलवून आणून त्याच्यापुढें पातकाचा अुच्चार केला. अर्थात् दुय्यम तांडेलांनी आणि खलाशांनींही मरणापूर्वी करावयाचा हा विधी अुरकून घेतला. आपली ही माणसें परत येतील कीं नाहीं अशी शंका असल्यामुळें या लोकांच्या नातेवाअिकांचे थवेच्या थवे समुद्रकाठीं जमा झाले. त्यांनीं मनांतून राजाला शाप दिला आणि रडत भेकत त्यांना निरोप दिला. नशिबाला हात लावून आणि बायकापोरांकडे शेवटचें पाहून खलाशीहि आपल्या कामाला लागले

कोलंबस आणि त्याचा मदतनीस पिंझो यांना मात्र खरा हुरूप वाटत होता. १८ वर्षे झालीं; कोलंबसाच्या मनांत जें करावयाचें होतें तें होण्याचा योग आज जमून आला होता. नवी भूमि शोधून काढीन, पुष्कळ पैसा मिळवून आणीन आणि मोटमोठ्या फौजा उभ्या करून खिस्ती धर्माचें जें पवित्र स्थान जेरूसलेम ते मुसलमानांच्या तावडीतून सोडवीन हे वेड त्यानें घेतले होतें. तें खरें ठरण्याचा संभव आज उत्पन्न झाला. इ. स. १४९२ त ऑगस्ट ३ या दिवशीं कोलंबसानें आपलीं जहाजें हांकारलीं.

सप्टेंबर ९ ला पोर्तुगीझ लोकांचे फेरो बेट त्याला लागलें. याच्यापुढें नावाडी लोक कधीं गेले नव्हते. तेथून पुढची सफर सुरूं झाल्यावर खलाशी लोक खचल्यासारखे दिसूं लागले. फेरो बेट लांबूनहि दिसेनासें झालें आणि त्याना वाटूं लागलें कीं, आपण आतां आपल्या नायका पोरांना खास मुकलो. ते रडूं लागले. कोलंबसानें त्यांची पुष्कळ समजूत घातली; थोड्याच दिवसानीं आपल्याला अेका सुंदर भूमीवर पाय ठेवतां येईल, तेथील हवा अतिशय मजेदार आहे, पशुपक्षी सुंदर आहेत, जमीन सुपीक आहे, झाडें फळा फुलांनी लटकलेलीं असतात आणि नद्यांच्या वाळवंटातून हिंडतांना जसें शिंपले वेचावे तसे सोन्याचे गोळे आपल्याला तेथें उचलतां येतील; असें प्रोत्साहनाचे शब्द कोलंबस त्यांना सांगूं लागला. पण ते म्हणत, "महाराज, हें सारें खरें, पण प्रथम आपण जगलों पाहिजे ! आणि तें जगूं असें आम्हांला वाटत नाहीं." अेकंदर तीन जहाजें होतीं. सर्वांच्या कर्णधारांना हुकूम होते कीं थेट पश्चिमेच्या रोखानें चालावयाचें. जमिनीपासून आपण फार दूरवर गेलों नाहीं असें खलाशांना भासवावें म्हणून कोलंबसानें रोज संध्याकाळीं झालेल्या प्रवासाचे आंकडे लावावयाचे दोन फळे तयार केले. अेक आपल्या स्वतःसाठीं आणि दुसरा बाकीच्या लोकांसाठीं. खरा आंकडा तो आपल्या फळ्यावर लिहून ठेवी आणि खोटा म्हणजे कमी मैल दाख-

विणारा तो त्या दुसऱ्या फळ्यावर लिहून ठेवी. सप्टेंबर १३ ला होका-यंत्राची सळई सरळ राहीनाशी झाली. कोलंबसानें प्रथम हें कोणालाच दिसूच दिलें नाहीं. पण लवकरच सुकाणूवाल्यानें तें ओळखलें. सळई वाकडी झालेली त्यांनीं कधीं पाहिली नव्हती. त्यामुळे दिशाच फिरल्या कीं काय असे हे लोक अेकमेकांत म्हणूं लागले. कोलंबसाला ज्योतिषाचें ज्ञान बरेंच होतें. नक्षत्र, तारा आणि होकायंत्र याचा संबंध काय असतो हें त्यानें त्या लोकांना समजावून सांगितलें; पण समजण्याची कुवत नसल्यामुळें ते गप्प बसले आणि कोलंबसाचे आयतेंच काम झाले! कांहीं थोड्याच दिवसात समुद्रावर फळे असलेल्या काही फांद्या त्यांना दिसल्या; तेव्हां खलाशी म्हणाले कीं, त्या जिकडून आल्या त्याच दिशेनें आपण जावें; पण तो म्हणाला हिंदुस्तान तिकडे सांपडावयाचें नाहीं. आपल्याला सरळच पश्चिमेकडे गेलें पाहिजे. फांद्या भेटेनाशा झाल्या. दिवस संपला म्हणजे रात्र आणि रात्र संपली म्हणजे दिवस यावा असा प्रकार सुरूं झाला. जमिनीचा मागमूसहि दिसेना. वर आकाश आणि खालीं पाणी या दोनच गोष्टी त्याना दिसत होत्या. वारा चांगला वाहात होता आणि त्यामुळें जहाजें वेगानें चालली होतीं. पण खलाशाना हा वेगच आपला शत्रू वाटूं लागला. कारण वाऱ्याचा वेग जों जों जास्त तों तों आपण आपल्या घरापासून अधिक अधिक दूर जातों असे त्यांना वाटूं लागलें. बरें, परत वळण्याची सूचना करावी तर पश्चिमेकडून वाराच येतां दिसेना. मग जहाजें पूर्वेकडे जाणार कशी ? सुदैवानें एक दोन दिवसांत पश्चिमेकडून वारा सुटूं लागला. मग कोलंबस म्हणाला कीं, आपल्याला जर परत जावयाचें झालें तर वारा नाहीं म्हणून निराश होण्याचें कारण नाहीं.

तीन चार दिवस गेले आणि दोन्ही दिशांचा वारा अगदीं बंद पडला. लाटा बंद झाल्या आणि जहाजें जेथल्या तेथें अुभी राहिल्यासारखीं झाली.

लोक म्हणूं लागले कीं, आपण अेकाद्या अुथळ समुद्रांत येअून अडकलों असावे. कोलंबसाने लागलीच नांगर टाकला आणि समुद्र कितीतरी खोल आहे हें त्यांना दाखवून दिलें. दुसरे दिवशी वारा पुन्हां सुरू झाला. लाटा अुठूं लागल्या आणि जहाजे पुन्हां वेगानें चालूं झाली. दिवसांमागें दिवस गेले पण जमीन कोठें दिसेना. खलाशी लोक अेकमेकांत तक्रार करूं लागले. " राजानें हा कोठला भुरटा परदेशी जवळ केला आणि स्वदेशाच्या माणसांच्या गळ्याला दावें लावून तें त्यांच्या हातीं दिलें " अशी तक्रार जो तो करूं लागला. " लोक चांगले सांगत होते कीं, हा अेक अुडाणटप्पू भटक्या आहे. पण तें राजानें अैकले नाही आणि आतां आमच्या जिवाला तात लागली आहे, आम्हीं याचें आतां कां ऐकावें ? " दुसरा म्हणे, " खरेंच आहे. परत फिर म्हटलें तर हा ऐकत नाहीं. " तिसरा म्हणाला, " हा बऱ्या बोलाने ऐकलेसे दिसत नाहीं. त्याला जरा चुणूकच दाखविली पाहिजे. " शेवटीं कांहीं लोक बेफाम होअून त्याला म्हणाले, " आतां जर तूं परत फिरला नाहीस तर तुझे हात पाय बांधून तुला समुद्रात फेंकून देऊं. नाहीं तर परत फीर. "

. अेकदां पिझोच्या हातून चूक झाली. सगळ्यांच्या पुढे त्याचें जहाज चाललेलें असे. रात्रीच्या वेळीं दूर अन्तरावर ढग पसरलेले होते. पण ते जमिनीसारखे दिसले. सर्वांप्रमाणें पिझोही अुतावीळ झालेला होता म्हणून ' जमीन ' ' जमीन ' असें तो मोठ्यानें ओरडला. पण सकाळ झाल्यावर पहातात तों ते केवळ ढग आहेत असें त्यांना दिसलें. अर्थातच खलाशांची दारुण निराशा झाली. ऑक्टोबर ७ च्या सुमाराला पक्ष्यांचे थवे अुडत जातांना दिसले. संध्याकाळ आहे तेव्हां पक्षी आपल्या घरट्यांकडेच जात असले पाहिजेत असें पाहून कोलंबसानें त्याच दिशेनें जहाजें वळविली. तीन दिवस या नादांत गेले. चौथ्या दिवशीं फळें असलेली एक झाडाची फांदी,

नक्षी केलेली अेक काठी आणि समुद्रतीराच्या आसपास सापडणारे मासे अशा वस्तू त्याना दिसल्या. कोलंबसानें हेरलें की, आता जवळपास कोठें जमीन असलीच पाहिजे. त्याच दिवशी रात्री दूर अन्तरावर त्याला दोनदां अुजेड दिसलासा वाटला. अुगाच बोभाटा न करतां त्यानें अेकदोघांना न्याहाळून पहावयास सांगितलें. तेहि म्हणाले कीं, अुजेडच आहे. पण ते सारे गप्प बसले. रात्री दोहोंच्या सुमाराला आघाडीला चाललेल्या पिंटा जहाजावरून बंदुकीचा कडाडून बार झाला. जमीन दिसली तर असा बार करावा असे ठरलें होतें. बार अैकताच सगळे लोक ताडकन् अुभे राहिले आणि जमीन जमीन असा जयघोष त्यानीं केला. जमीन तर आहेच आहे पण तीवर दिवेहि आहेत म्हणजे माणसाची वस्तीहि तेथें आहे हें मनात येअून तर लोक केवळ हर्षभरित होअून गेले.

तांबडे फुटलें आणि जमीन स्वच्छ दिसूं लागली. समुद्रकांठ संपल्यावर हिरव्यागार जमिनी पसरल्या आहेत, त्यांच्या पलीकडे झाडांच्या गर्द राया लागल्या आहेत आणि दूरच्या टेकड्यावरील अुतरणींवरून पाण्याचे खळखळाट वहात आहेत असा देखावा त्यांनीं पाहिला. लोक आनंदानें बेहोष होअून गेले.

कोलंबसालाहि अेकदम नवा हुरूप आला. आतांपर्यंत तो बाह्यात्कारी धीर दाखवीत होता. परंतु दिवसामागें दिवस गेले तरी जमीन दिसत नाहीं हें पाहून त्याचाहि धीर खचूं लागला होता. त्याला मुख्य काळजी ही होती कीं, निराश झालेले खलाशी कदाचित् बंड करतील आणि जबरदस्ती करून जहाजें परत घराकडे वळवतील. पण आतां भूमि दिसूं लागतांच त्याचे ते भय आणि काळजी अेकदमच नष्ट झाली आणि आपण केलेलें भाकित अखेर खरें ठरत आहे हे पाहून तो केवळ हर्षभरित होअून गेला. त्यानें कृतज्ञता-बुद्धीनें आकाशाकडे पाहिलें आणि त्याच्या डोळ्यांतून अश्रूंच्या

धारा वाहूं लागल्या. त्याने आतापर्यंत फार अपमान मोसला होता; लोकांनी त्याची अवहेलना केली होती आणि केवळ ध्येयवादासाठीं त्यानें सारा जन्म दारिद्र्यात घालविला होता. लोकानी आपल्याला लबाड, पैसेकाढू, भटक्या अशा शिव्या दिल्या, याचें त्याला स्मरण होतें; पण तेच आपण परमेश्वराच्या अेका विशाल योजनेचें साधन होत आहो हे पाहून त्याला पराकाष्ठेचे समाधान झालें. खलाशांनींहि पाहिले कीं आपण जरी अद्वातद्वा बोललों असलो तरी आपला कप्तान खरा खरा मोठा मनुष्य आहे. अर्थात् त्याना पश्चाताप होअूं लागला आणि त्यानीं त्याच्यापुढे लोटांगणें घातलीं. ज्यांनी त्याला आतांपर्यंत शिव्या दिल्या होत्या ते आता त्याचा जय-जयकार करूं लागले.

सूर्य-प्रकाशाची कांति बेटावरील वस्तुजातावर पसरली आणि तें अधिकच शोभिवन्त दिसूं लागलें आणि मग सर्वांनीं आपापले पोषाख घातले. कोलंबस तर दर्यासारंगच होता. अर्थात् त्याचा पोषाख त्याच्या वैभवाला आणि दर्जाला साजेसा भरजरी होता. तो त्यानें घातला, कमरपट्टयाला तलवार लाविली आणि हातांत स्पेनच्या राजाचे निशाण घेअून तो जमिनीवर अुतरला. सर्वच लोकांनीं त्या भूमीचें चुंबन घेतलें आणि मग गुडघे टेकून त्यानी भक्तिभावानें परमेश्वराची प्रार्थना केली. जगाच्या इतिहासात जे दिवस फार महत्त्वाचें म्हणून समजतात त्यातच या दिवसाची गणना केली पाहिजे; कारण आज अेका नव्या विशाल भूमीचा शोध लागलेला होता; अटलांटिक महासागर म्हणजे सैतानाचा प्रदेश नव्हे आणि त्यातून पुढें जाणारे पाताळाच्या दरींत अुतरत नाहींत हें सिद्ध झालें होतें. अेका नव्या युगाचाच अनावरण विधि झालेला होता आणि तो कोलंबसाच्या हस्तें झाला होता. असा हा अेक भव्य प्रसंग होता.

ज्या दिवशीं पहिली आगगाडी चालूं झाली असेल, बिनतारी संदेश ज्या

दिवशीं माणसानें पहिल्या दिवशीं अैकला असेल, तो दिवस विशेष मोलाचा असें आपण समजतों; पण तितक्याच मोलाचा हाहि दिवस होता. ज्या धरणीवर आपण फिरतों तिचा व्याप तरी किती आहे याचीसुद्धां कल्पना माणसांना नव्हती. कोणीकडे बर्फाचा खच तर कोणीकडे अुन्हाची दाहक रणरण आणि कोणीकडे अफाट समुद्राचा तिमिरमय विस्तार अशा वेढ्यांत यूरोपांतील मनुष्ययोनि सहस्रावधि वर्षें सांपडलेली होती; यामुळें पृथ्वीचा विस्तार किती आहे याचीच कल्पना मनुष्य-प्राण्याला नव्हती. सध्यां आपले शास्त्रज्ञ चंद्र-बिंबावर अुड्डाण करण्याची गोष्टी बोलत आहेत. पण चारपांचशें वर्षांपूर्वी समुद्राच्या पलीकडे काय आहे हेंसुद्धा आपणांस माहित नव्हतें. कोलंबसानें छाती केली आणि सृष्टीने तोपर्यंत दडवून ठेविलेलीं रहस्यें त्यानें अुघडकीस आणलीं. असा कोलंबसाचा महिमा आहे.

किनाऱ्यावर अुतरलेले लोक अुंच होते, सुस्वरूप होते आणि गोरेपान होते. त्याच्या हातांत नानाप्रकारचीं शस्त्रे होतीं आणि त्यांच्या अंगावर शोभिवन्त वस्त्राभरणे होतीं. कांहीं अेक विशेष नवे घडवून आणल्याचे तेजहि त्यांच्या मुखांवर दिसत होतें. त्याच्याकडे बघून त्या भूमीतील माणसें अगदी दिपून गेली. पहिल्या पहिल्यानें तीं त्यांच्या जवळच येईनात. कोलंबसाला वाटत होतें कीं, आपण हिंदुस्तानात आलों आहोंत. कारण हिंदुस्तान पूर्व दिशेला आहे आणि अटलांटिक महासागरांतून थेट पश्चिमे-कडे जात राहिलें म्हणजे केव्हां तरी आपल्याला हा देश लागेल अशी खात्री त्याला वाटत होती. अर्थातच हें हिंदुस्तानच अशा दृष्टीने तेथील सर्व गोष्टींचा अर्थ तो बसवूं लागला. तेथील पक्षी त्याला फार सुन्दर आणि तेजस्वी दिसले आणि तो मनांत म्हणाला, हें हिंदुस्तानच असलें पाहिजे ! तेथील हवा त्याला मोठी मजेदार आणि हुरूप आणणारी वाटली आणि तो मनांत म्हणाला हें हिंदुस्तानच असलें पाहिजे. या हवेला मसाल्याचा वास येत

आहे असेहि त्याला वाटलें आणि म्हणून तो म्हणाला, हे हिंदुस्तानच असले पाहिजे ! परन्तु आपल्याला माहित आहे कीं हे हिदुस्तान तर नव्हतेच नव्हते; पण खुद्द अमेरिका खंडहि नव्हते ! अमेरिका खंडाच्या आसपास अलीकडे असलेले हें अेक बेट होतें. या बेटातून अमेरिका खंडावर जाऊन, तें ओलांडून, पुढें पसरलेला विशाल पॅसिफिक महासागर ओलांडून, यवद्वीप, मलयद्वीप हीं मागें टाकून, सहस्रावधि योजनेपुढे गेल्यावर मग हिदुस्तान देश लागणार आहे असें जर त्याला माहित असतें तर हे सफरीचें काम त्याने हातीं घेतलें असते असें वाटत नाहीं. पण अटलांटिक महासागर ओलांडला की लगेच हिदुस्तान लागते आणि अटलांटिकचा विस्तार फार थोडा आहे असा त्याचा समज होता, म्हणून त्यानें ह्या साहसाला हात घातला. पण या त्याच्या अज्ञानामुळेच माणसाच्या जातीला पृथ्वीचें नवे ज्ञान झाले.

त्याचे काही लोक आतील प्रदेशात गेले आणि तद्देशीय माणसांची रूपे त्यांनीं पाहिली. हे लोक फार सभ्य आणि समंजस दिसले. यातल्या कांही लोकांच्या तोंडांत पानांच्या पेटविलेल्या सुरळ्या होत्या. या सुरळ्यांतून तोंडात येणारा धूर हे लोक मौजेने बाहेर सोडीत असत. हीच ती सध्याची तंबाखू होय. मग कांठाकांठानें हिडून त्यानें त्या स्थल–विशेषाना निरनिराळी नावें दिली. प्रदेशात शिरल्यावर ज्या सोन्याची त्याला अेवढी हाव सुटली होती ते सोनेंहि त्याला येथे मुबलक सापडूं लागलें. कोलंबसानें बरेच दिवस या ठिकाणीं घालविले आणि मग नवी भूमि शोधून काढल्याचें हें शुभ वर्तमान फर्डिनंड आणि इझाबेला यांना सांगण्यासाठीं आतां आपण परत स्पेन देशाला जावें असें त्याने ठरविलें. पण कांहीं झाले तरी हें हिंदुस्तान नव्हें हें त्याला कळून चुकले असले पाहिजे. हिंदुस्तानांत सोनें रगड आहे असें त्यानें अैकलें होतें आणि सोन्यापुरतेंच पाहिलें तर त्याचा

अन्दाज बरोबर होता. पण हिंदुस्तान देशातील माणसे फार सुसंस्कृत आहेत, तेथे मोठमोठीं साम्राज्यें उदयास आलीं आहेत आणि तेथे कला-कौशल्यें वाढीस लागलेलीं आहेत हेहि त्याने अैकले होतें. त्यांतले या ठिकाणीं त्याला कांहाच दिसले नाहीं म्हणून हा देश हिंदुस्तान नसावा हे त्यानें मनच्या मनांत ओळखले असले पाहिजे. परन्तु अटलांटिक महासागर ओलांडतां येतो, पलीकडे अेक विशाल भूमि आहे आणि त्या भूमीवर सोनेंहि खूप सांपडते अेवढा शोधहि लोकविलक्षणच होता. अेवढ्यावर संतुष्ट होअून त्यानें परत फिरण्याचा निश्चय केला.

परंतु त्याच्या कित्येक खलाशांना तें बेट इतकें आवडले कीं आपण परत येत नाही असें ते म्हणूं लागले! कोलंबसाला याचे नवलच वाटलें त्याना राहण्यासाठीं अेक किल्ला बांधण्याचे काम मग त्यानें सुरू केले. किल्ल्याच्या भोवताली त्यांनी अेक खंदकही खणला आणि जवळचा बराचसा दारूगोळा व हत्यारे त्याने तेथे ठेअून दिलीं. तेथें राहूं इच्छिणाऱ्या हौशी खलाशाना त्याने सांगितले कीं तुम्ही नीट तरतूदीनें रहा. अर्थात् कोलंबसाला आणि त्या खलाशांना खासच वाटत होते कीं हीं जहाजें घरी जाअून आपण पुन्हां परत येणार आहोत! कोलंबसानें तेथे बांधलेला किल्ला ही वसाहतीची मूळ कल्पना होय. मग बरेचसें सोनें, कांहीं सुंदर पक्षी, पांचसहा तद्देशीय माणसे आणि कांहीं चमत्कारिक वनस्पति बरोबर घेऊन कोलंबस परत निघाला.

परतीचा प्रवास कोलंबसाला फारसा सुखाचा गेला नाहीं. जमिनीवरचा अुजेड हा प्रथम आपल्याला दिसला आणि मागून कोलंबसाला दिसला असा रॉड्रिग बर्मेजो ' या अेका खलाशाचा दावा होता. पण जमीन पाहिल्याचें श्रेय कोलंबस घेणार हे पाहून हा रॉड्रींग रुष्ट झाला होता. पिझो याच्याशीं कांही तरी कारणानी कोलंबसाचे भांडण झाले. आणि

तोहि दूर निघून गेला. समुद्रावर ठिकठिकाणी वादळें झालीं आणि आपण बुडणार असें कोलंबसाला वाटू लागलें. मग आपल्या सफरीचें वृत्त त्यानें लिहून काढलें आणि तो कागद अेका मेण–थैलींत बंद करुन टाकला. या थैलीवर पुन्हा मेणाचे अनेक थर त्यानें बसविले आणि ती त्यानें अेका पिपांत घातली व या पिंपाचें तोंडहि त्यानें चांगले बंद करुन तें त्यानें समुद्रांत सोडून दिलें. कोलंबसाला वाटलें कीं जर कदाचित् आपण बुडालों आणि हे पीप वहात वहात यूरोपच्या किनाऱ्याला लागलें तर आपल्या सफरीची सर्व हाकिगत आतील थैलीतील कागदावरून तरी सर्वांना कळेल. सुदैवानें वादळहि शांत झाले; आणि कोलंबसाचे जहाज येतां येता पोर्तुगालच्या किनाऱ्याला लागलें.

कोलंबस परत आल्याची बातमी हां हा म्हणता सर्व लिस्बन् शहरभर पसरली. याच माणसाला आपण धिःकारून परत लाविले होतें याची आठवण होअून राजा मनांत खजील झाला. तथापि त्याने कोलंबसाचें स्वागत केलें; आणि त्याचा बहुमानहि केला. तेथून निघून कोलंबस स्पेनच्या किनाऱ्याला गेला; आणि आपण परत आल्याची पत्रें त्यानें फार्डिनंड आणि इसाबेला यांना लिहिली. ही बातमी राजवाड्यांतून बाहेर पडून मग सर्व राजधानीभर पसरली. दरम्यान आपल्या सर्व लवाजम्यासह कोलंबसहि राजधानींत येअून प्राप्त झाला. राजाच्या इच्छेप्रमाणें राजवाड्याकडे त्याची मिरवणूक निघाली. प्राचीन काळीं रोमन् वीर पुरुष विजय मिळवून आलेला असला म्हणजे त्याची मोठी मिरवणूक निघत असे. पण ती मिरवणूक सुद्धां कोलंबसाच्या मिरवणुकीइतकी डौलदार नसेल! सर्वांच्या पुढें तिकडून आणलेले ते सहा इंडिअन्स चाललेले होते. त्यांची रंगविलेलीं अंगे आणि त्यांच्या अंगावरील सोन्याचे दागिने पाहून राजधानींतले लोक चकित होऊन गेले. या रानटी लोकांच्या मागून कोलंबसानें बरोबर आण-

लेला अनेक चित्रविचित्र पशुपक्ष्यांचे पिंजरे चालले होते. त्याच्या मागे उंचावर ठेवलेले सोन्याचे मुकुट आणि सलकडीं अशासारखे जिन्नस रथावर झगझगत होते. त्याच्या मागून घोड्यावर स्वार होऊन आणि स्पेनच्या राजाचे निशाण हातात घेऊन कोलंबस मोठ्या ऐटीनें चालला होता. राजवाड्यापुढे विस्तीर्ण पटांगण होते. त्यावर राजाने आज आपला



दरबार भरविला होता. मध्यभागी सिंहासन मांडून दोन्ही बाजूंच्या उच्चासनावर मोठमोठाले मांडलिक, अमीर, उमराव, विद्वान्, शास्त्री, पंडित, धर्मवेत्ते असे लोक बसलेले होते. आणि भोवताली सहस्त्रावधि नागरिक उभे होते. कोलंबसाची स्वारी पुढे येताच त्याच्या स्वागतासाठीं राजाराणीसह सर्व सभा एकदम उभी राहिली. राजाला अभिवादन करण्यासाठीं

कोलंबस गुडघे टेकणार तोंच राजानें त्याला हात देऊन उभें केलें. सर्वच लोकांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. गळा दाटून आल्यामुळें कोलंबसाच्या तोंडून शब्द निघेना. शेवटीं आनंदाचा भार हलका झाल्यावर कोलंबसानें आपल्या मुखानें सफरीची हकिगत सभेला सांगितली. ती ऐकून तमाम लोक खूष होऊन गेले. राजा-राणीनें देवाची प्रार्थना केली; आणि कोलंबसावर पारितोषिकांचा वर्षाव केला. पूर्वी ठरवल्याप्रमाणें जो कोणी जमीन पहिल्यानें पाहील त्याला आमरण वेतन मिळणार होतें. राजाराणीनें तें कोलंबसालाच दिलें. परन्तु रॉड्रिग् याच्या अंगाचा मात्र अतिशय संताप झाला. कारण बेटावरचा उजेड आपण प्रथम पाहिला असा त्याचा दावा होता. हे ख्रिस्ती लोक वडे लुच्चे आहेत असें म्हणून तो त्या धर्मांतून उठून गेला आणि मुसलमान झाला. पण ही अेक गोष्ट सोडली तर कोलंबसाची सफर पूर्णपणें यशस्वी झाली. रॉड्रिग्चा दावा कदाचित् खराहि असेल पण दिवा पहिल्यानें पाहिला ही गोष्ट केवळ शब्दार्थानें खरी असेल. बक्षिस दिवा पाहण्यासाठीं नसले पाहिजे! बेट शोधून काढण्याचा मान निःसंशय कोलंबसाचाच होता. त्यानें जर वीस वर्षपर्यंत एकच ध्यास घेतला नसता, राजेरजवाड्याच्या दरवाजात साहाय्यासाठीं गयावया केलें नसतें; अंधाऱ्या समुद्रात जहाजें हाकारलीं नसतीं आणि निराश झालेल्या खलाशांना दादाबाबा करून सफरीचें काम शेवटपर्यंत नेलें नसतें तर हा राड्रिग् अुजेड तरी कोठला पहाणार होता? असो. कोलंबसाचें जीवितकार्य या ठिकाणीं परिपूर्ण झालें असेंच समजलें पाहिजे. ही सफर यशस्वी झाल्यामुळें कोलंबसाला नवा हुरूप आला आणि राजानेंहि नव्या सफरीची तयारी त्याला करून दिली. अशा चारपांच सफरी कोलंबसानें केल्या. मात्र हिंदुस्तान देश त्याला सांपडला नाहीं हें शिल्लकच राहिलें! अटलांटिक महासागर ओलांडल्यावर त्याला अमेरिकेची केवळ

ठेंच लागली असेंच समजलें पाहिजे. परन्तु हें त्याचें कृत्यहि जगाच्या इतिहासांतील अद्‌भूत कृत्यांतच गणलें पाहिजे.

परन्तु कोलंबसानें या अनेक सफरी जरी पुन्हा केल्या तरी पहिल्या सफरीतील त्याच्या हेतूचा उदात्तपणा या नव्या सफरींत दिसून आला नाहीं. एक महत्त्वाची गोष्ट आपल्या ध्यानांत येते, ती ही कीं हिंदुस्तानाला जाण्याचा मार्ग जर त्याला शोधून काढावयाचा होता आणि ज्या बेटावर तो जाऊन पोंचला होता तें बेट किंवा त्याच्या लगत पलीकडे असलेली विस्तीर्ण भूमि म्हणजे हिंदुस्तान नव्हे हें जर त्याला अनुभवाने कळून चुकले होतें तर या नव्या सफरींचा उद्देश हिंदुस्तानची वाट शोधून काढणें हाच असावयास हवा होता. चार पांच सफरी झाल्यानंतर सुद्धां हे बेट किंवा अमेरिका म्हणजेच हिंदुस्तान असा त्याचा समज होणें किंवा टिकून रहाणें सर्वथा अशक्य होतें. युरोपातील लोकांनीं हिंदुस्तान प्रत्यक्ष पाहिले नसले तरी तो देश माणसांनीं चांगला गजबजलेला आहे, तेथील लोक सुसंस्कृत आहेत, येथे व्यापार आणि कलाकौशल्य यांची वाढ झालेली आहे आणि तेथें मोठमोठालीं साम्राज्ये आहेत या गोष्टी त्याच्या कानी गेलेल्याच होत्या. हिंदुस्तानातील लोक रानटी असून अर्धनग्न स्थितीत हिंडतात आणि तेथें सोन्याचे गोळे सांपडतात अशी हिंदुस्थान देशाची माहिती कोलम्बसाच्या कानांवर खचित गेलेली नव्हती. ज्या बेटावर तो गेला त्या बेटावर त्याला हिंदुस्थानच्या खुणा सांपडल्या असें म्हणतां येईल काय ? एका खेपेला तो फसला असें जरी म्हटलें तरी तीन चार खेपा झाल्यावर हें हिंदुस्तान नव्हे असें त्याच्या ध्यानांत येऊन चुकलें असले पाहिजे आणि म्हणून आपला मूळचा उद्देश साध्य झालेला नाही हें पाहून तो साध्य करून घेण्यासाठीं त्यानें नवे प्रयत्न करावयास हवे होते. पण त्यांतलें काहींच झालें नाहीं. केवळ एक नवी भूमि पायाला लागली आणि

चार सोन्याचे गोळे तेथें सांपडले कीं ताबडतोब परत निघावयाचे या उद्देशानें त्यानें हें साहस केलेलें नव्हतें. असें जर आहे तर आणखी चार पांच सफरी करण्यांत त्यानें कृतकृत्यता कां मानली हें समजत नाहीं.

बरें, ज्या फर्डिनंड आणि इसाबेला या जोडप्यानें त्याचा मूळचा हेतु त्याच्या तोंडून ऐकला होता त्यांनीं तरी त्याला विचारावयास हवें होतें कीं समुद्राच्या पलीकडे तुम्हांला जमीन लागली हें फार बरें झालें; तुम्ही थोडेसे सोनें घेऊन परत आला याचेंहि आम्हांला कौतुक वाटतें; पण पश्चिमेकडे जात राहिल्यानें आपण शेवटीं हिंदुस्तान देशाला पोहचूं ही जी तुमची मूळची कल्पना होती तिचें काय झालें ? तुम्ही ज्या जमिनीला जाऊन लागला तेथील कांहीं माणसें घेऊन तुम्ही परत आला; पण हीं माणसें रानटीं आणि अंगाला रंग लावून फिरणारी दिसतात; आणि आम्ही तर ऐकत आलों आहों कीं हिंदुस्तानांतील लोक अतिशय सुधारलेले आहेत. तुम्ही पूर्व दिशेचा शोध लावणार म्हणून तार्तरी देशाच्या राजाला देण्यासाठीं आम्ही कांहीं पत्रेंहि तुमच्याबरोबर दिलीं होतीं त्यांचें काय झालें ? तुम्ही ज्या भूमीवर जाऊन पोहोंचला ती भूमि म्हणजे तार्तरी नव्हे हेंहि तुमच्या ध्यानांत आलें असेलच; तर मग तुमच्या मूळच्या हेतूचें काय झालें ? तुम्ही पुन्हां तिकडे जाऊं म्हणतां तर आम्ही तुमची तरतूद करून देतों; पण तुमचा मूळचा हेतु साध्य करण्यासाठीं या नव्या सफरी तुम्ही काढल्या पाहिजेत. फर्डिनंड आणि इसाबेला यांनीं कोलंबसाला असे प्रश्न खासच विचारले असले पाहिजेत, निदान विचारावयास हवे होते.

फर्डिनण्ड आणि इसाबेला यांचे अेक वेळ असो; पण दरबारांतील ज्या लोकांनीं कोलंबसाची थट्टा केलेली होती, त्याला हरतऱ्हेचीं नांवें ठेवलेलीं होतीं व त्याला साहाय्य करूं नये असा निकाल दिला होता ते लोक केवळ पांचसहा रानटीं माणसें आणि सोन्याची सलकडीं अेवढी फलश्रुति पाहून

गप्प बसले असतील असें वाटत नाहीं. राजाराणीला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें ते म्हणाले असतील कीं, कोलंबस हिंदुस्तान देशाला जाऊन पोचणार होता त्याचें काय झालें? तार्तरी देशाच्या राजाला द्यावयासाठीं जी पत्रें राजेसाहेबांनी त्याच्याबरोबर दिली होती ती त्यानें त्या राजाला दिली काय? हे लोक खासच असें म्हणूं लागले असतील कीं जो उदात्त हेतु कोलंबसानें मनात धरला आहे असे आपण ऐकत होतो तो खचितच सिद्ध झालेला नाही, अथवा तो मूळांतच त्याच्या मनांत नसला पाहिजे! पश्चिमेकडील समुद्राच्या पलीकडे कांही बेटें आहेत किंवा अेक विस्तीर्ण भूमि आहे हे इतर खलाशानीहि आधी सांगितलेले होते आणि ती खात्री होती म्हणूनच यानें त्या समुद्रातून जाण्याचें साहस केलें, याची कर्तबगारी एवढीच कीं हा प्रत्यक्ष तेथें जाऊन आला आहे आणि खलाशानीं दिलेली माहिती खरी आहे एवढेंच त्यानें सिद्ध केले आहे. पण येवढेंच सिद्ध करण्यासाठी तो मुळींच गेलेला नव्हता. पश्चिमेच्या रोखानें जाता जाता पूर्व दिशेला जाऊन पोहोचतां येते हा त्याचा सिद्धांत, तो हिंदुस्तानला जाऊन पोंचला असतां तरच, सिद्ध झाला असता आणि तो हिंदुस्तानाला तर मुळीच गेलेला नाहीं. मग त्याचे अेवढें स्तवन कशासाठी?

असें वाटते की या सर्व शंका कुशंका तेव्हां उत्पन्न झाल्या असतील; पण कोलंबसाच्या बाजूचे लोक अेवढेंच म्हणाले असतील कीं या शंका जरी खऱ्या असल्या तरी अेका अंधाऱ्या समुद्रांतून त्यानें मोठी साहसाची सफर केली आहे हें कांहीं खोटें नव्हे. पूर्वी माहित नसलेली अेक जमीनहि त्यानें शोधून काढली आहे आणि तेथें रगड सोनें सांपडतें हेंहि त्यानें दाखवून दिलें आहे. म्हणून आपण अेवढ्यावरच सन्तुष्ट असावें आणि त्यांचा मान सन्मान करावा! असो.

कोलंबसानें आणखी चार पांच सफरी केल्या हें वर सांगितलेंच आहे.

या सफरींतून काय निष्पन्न झालें तें पाहिलें म्हणजे मन थोडेसें खिन्नच होतें. दरवेळीं तेथें जावें; नवे किल्ले बांधावे; तेथील लोकांना राबवून सोनें गोळा करावें हाच उद्योग त्यानें सुरू ठेविला. त्याच्या बरोबरचे खलाशी तर महादुष्ट होते. ज्याना घरच्या घरी काही करतां येण्यासारखे नव्हतें किंवा घरी आपण नकोसे झालो आहो असें ज्यांना वाटत होतें ते अनेक लोक नशिबाची परीक्षा पाहण्यासाठीं त्याच्याबरोबर तिकडेच जाऊं लागले; कारण त्यांनीं अैकलें होते कीं तेथे पुष्कळ मोकळी जमीन आहे, माणसें अडाणी आहेत, त्याना लुबाडणे सोपे आहे आणि सोनेंहि पुष्कळ सांपडते. सोन्याच्या जोडीला कापूस गोळा करण्याचाहि हव्यास कोलंबसानें धरला. अमुक दिवसांत प्रत्येक माणसाने इतक्या वजनाचें सोनें गोळा करून दिलेंच पाहिजे किंवा इतके गठ्ठे कापूस बांधून आणून दिला पाहिजे अशी सक्ती त्याने आरंभिली. ज्याने आपलें काम पुरें केलें आहे त्यांच्या गळ्यांत खुणेसाठीं अेक तांब्याचा पत्रा बांधण्याची पद्धत त्यानें ठेविली आणि सांगितलेल्या कामांत कुचराई करतात म्हणून उरलेल्या लोकांना खलाशांकडून फटके मारण्याची व्यवस्थाहि त्याने केली! धन्यानें हा पायंडा घातल्यावर खलाशांनी केवढा प्रलय आरंभिला असेल याची कल्पना सहज करतां येअील. शिवाय हे खलाशी लोक तेथे अगदीच मोकाट सुटले आणि तेथील स्त्रियांच्या अंगाला हात लावण्यासहि त्यांनीं कमी केलें नाही. तेव्हा त्या रानटांच्या ध्यानात आले की गोरे गोमटे दिसणारे हे लोक देव-दूत नसून केवळ हैवानच आहेत.

कोलम्बसाचा अधःपात याहि पुढे गेला. त्याला वाटूं लागलें कीं येथले रानटी लोक धरून नेऊन युरोपांत विकता येण्यासारखे आहेत; गुलाम म्हणून त्यांना कोणीहि विकत घेईल असा अन्दाज बांधून जहाजें भरभरून त्यानें हे रानटी लोक आपल्या देशाला धाडले आणि राजाला कळविलें

कीं या लोकांची विक्री झाली म्हणजे ह्यांना खिस्ती धर्माची दीक्षा द्यावी. असें झालें म्हणजे यांचा व्यापार करून आपल्याला पैसाहि मिळेल आणि यांच्या आत्म्याचें तारणहि होईल. अशा प्रकारें आपला स्वार्थ आणि त्या रानटांचा परमार्थ ह्या दोहोंचा मेळ कोलम्बसानें अुत्तम बसविला ! त्याच्या या योजनेप्रमाणें रानटी लोकांची जहाजें भरून देशांत आलेली पाहून इसाबेला राणी मात्र अगदी चवताळून अुठली; ती म्हणाली कीं, ‘ तुम्हीं ह्या लोकांचा व्यापार कां मांडता ? ह्यांना तुम्ही परत न्या आणि आपल्या मुलांमाणसांत नेअून सोडा.’ दुर्दैवाची गोष्ट अशी की कोलम्बसाच्या हातून गुलामगिरीच्या या संस्थेची स्थापना व्हावी. परन्तु जो अितिहास झाला आहे तो पत्करलाच पाहिजे. हळू हळू लोकमत कोलम्बसाच्या विरुद्ध जाअूं लागलें. तिकडे सांपडणारें सोने कोलम्बस दाबून ठेवतो, या बेटाच्या समुद्र-किनाऱ्यालगत वाटेल तितके मोतीं सापडते तेही हा गिळंकृत करून बसतो असे आरोप त्याच्यावर होऊ लागले. खिस्ती केल्यानन्तर या लोकांची विक्री करता यावयाची नाही म्हणून हा तिकडील लोकाना बाप्तिस्मा देऊं देत नाही अशी तक्रार तिकडे गेलेल्या धर्मोपदेशकांनीं चालू केली. शेवटीं राजानें त्याला कामावरून दूर केले आणि या नव्या भूमीचा कारभार पहाण्यासाठी एका नव्या ताडेलाची योजना केली. तिकडे जातांच या नव्या माणसानें कोलम्बसाला कैद केलें, त्यानें त्याला दण्डा बेडी घातली; आणि स्पेन देशात पाठवून दिले. त्याची ती दुरवस्था पाहून राणीला अति-शय वाईट वाटलें आणि पहिल्या सफरीचें त्याचे महनीय कृत्य स्मरून तिनें त्याची दण्डा–बेडी काढून घेतली.

पण अेकन्दरीनें पाहातां कोलम्बसाची सद्दी केव्हांच संपून गेली होती. त्याला आतां कोणाचा आश्रय अुरला नाहीं. राजाराणी मरून गेली आणि तो अगदी अुघडा पडला. त्याला दुपारची भ्रांत पडू लागली. त्याचें वयहि

बरेंच झालें आणि शरीराला अशक्तता येऊं लागली. कर्जाखालीं कपाळ



छिनत चालले. संधिवातानें शरीर आंखडून गेले. आपल्या मुलाला त्याने कष्टी मनाने लिहिलें कीं, ' मी शोध लावला म्हणून मला मोठें अिनाम मिळणार होते; पण मला अेक कवडीहि मिळत नाही. मी केवळ अुचा-पतीवर जगत आहें. वीस वर्षं मीं हाडांची काडे केली आणि माणसांना नवी पृथ्वी दाखविली पण माझी म्हणून म्हणावयास अेक अुंगळभर जमीनसुद्धां माझ्यापाशीं नाहीं. कोठल्या तरी भटारखान्यांत मी तुकडा खातों आणि तो घालणाराला पैसे कोठले द्यावे म्हणून विवंचनेंत पडतों !

अशा आपत्तींत दिवस जातां जातां आपलें आटपत आल्याचें कोलं-बसाला दिसूं लागलें. जवळ प्रत्यक्ष कांहींच नव्हतें. कागदोपत्रीं कांहीं थोडेसें होतें. त्याची त्यानें वांटणी करून ठेविली आणि सश्रद्ध मनानें परमेश्वराची करुणा भाकली. वयाच्या सत्तराव्या वर्षी म्हणजे इ. स. १५०६ मे महिन्याच्या वीस तारखेस कोलम्बसानें प्राण सोडला.

# कॅप्टन् कुक्

कॅप्टन कुक् हा इंग्लंडात यॉर्कशायर परगाण्यांतील मार्टनरिन गांवी १७२८ च्या २७ व्या तारखेस जन्मास आला. याचा बाप शेतावर मोलमंजुरी करीत असे. आपल्या सारख्याच एका गरीब कुळातील स्त्रीशी त्याने लग्न केलें, आणि दोघेंही प्रामाणिकपणाने पोटाला मिळवून सुखासमाधानानें राहूं लागलीं. लवकरच, एका मोठ्या शेतवाडीच्या देखरेखीचें काम या गृहस्थाकडे आले. कुक् हा बापाच्या हाताखालींच नेहमीं इकडे तिकडे करीत असल्यामुळे त्याच्या शिक्षणाची हयगयच झाली. तो चागला तेराचौदा वर्षांचा झाल्यावर, त्याला काहीं उजळणी आणि हिशेब येऊं लागले. तो सतरा वर्षांचा झाल्यावर, बापाने त्याला, चार वर्षाच्या बोलीने, वाणसौद्याची आणि कापडचोपडाची माहिती व्हावी म्हणून, सॅंडरसन या नांवाच्या व्यापाऱ्याच्या हवाली केलें. या व्यापाऱ्याला लवकरच दिसून आले की, मुलगा फारसा शिकलेला नसला तरी, हिशेब करण्यात आणि कामाचा निकाल लावण्यांत वयाच्या मानाने चागलाच पटाईत आहे. जवळच समुद्र किनारा होता. आणि त्यामुळें, नावाड कामांत गुंतलेले पुष्कळ लोक कुकच्या ओळखीचे झाले; आणि आपण करीत असलेल्या कामापेक्षां समुद्रावरचें कांहीं काम करावयास मिळालें, तर तें जास्त बरे, असें वाटून त्याने त्या व्यापाऱ्याची रजा घेतली.

१७४६ त वॉकर कंपनीत तीन वर्षांचा कागद लिहून देऊन त्याने उमेदवारी पत्करली; आणि तो समुद्रावर हिंडू लागला. कंपनीच्या मालकाचें त्याच्याविषयी फार चांगले मत झाले. १७४९ त एका जहाजाची दुरुस्ती करण्याच्या कामावर कंपनीने त्याला पाठविले; तेही काम कुकनें चोख बजावलें. तीन वर्षांची मुदत संपताच बाल्टिक समुद्रात फेऱ्या करणाऱ्या एका जहाजावर त्याने नोकरी धरली; आणि दोन वर्षांत त्यानें याही कामांत प्रावीण्य संपादन केलें. लवकरच मालकाने त्याला कॅप्टनची जागा देऊं केली. परन्तु कुकने ती पत्करली नाहीं.

१७५५ त इंग्लंड आणि फरान्स याचे युद्ध सुरू झालें. यावेळीं कुकचें जहाज थेम्स नदीवर होते. शेकडो जहाजवाल्याना सरकारी नोकरीत येण्याच्या नोटिसा आल्या. कुकच्या मनात, असली नोकरी करावयाची नव्हती; म्हणून तो दडून बसला; पण, हे उघडकीस आल्यावाचून रहाणार नाहीं, असे पाहून तो आपण होऊनच आरमारखात्याकडे अर्जदार म्हणून आला. 'ईगल' नावाच्या जहाजावर त्याची नेमणूक झाली. कुकच्या कामातील दक्षता आणि तत्परता पाहून कॅप्टन हॅमर याला मोठा संतोष झाला. अर्थातच हॅमरने वेळोवेळीं त्याची बढती केली.

पोराने बरेच नाव कमावले आहे, असे पाहून त्याच्या मित्रांनी पार्लमेंटच्या एका सभासदाकडून कप्तानाला पत्रे लिहविलीं की, कुकला एकादी मोठी जागा द्यावी. वास्तविक पाहता, असल्या शिफारशीची जरूरीच नव्हती. १७५९ त गार्लंड नांवाच्या एका जहाजाचा तो तांडेल झाला. तेथून त्याची बदली मर्क्यूरी जहाजावर झाली. हें मर्क्यूरी जहाज कॅनडा देशांतील क्वेबेकच्या कामगिरीवर गेलें; आणि तेथें सेन्ट लॉरेन्स या नदीच्या पात्राची ठिकाठिकाणची खोली पहाण्याचें काम या जहाजाकडे आलें. कुक हा अतिशय हुषार माणूस आहे, हें कप्तानाला माहित झालें असल्यामुळें

त्यानें त्यालाच या कामावर नेमलें. फ्रेंच लोकाना कळूं नये म्हणून, हें नदीवरचे काम रात्रीच्या वेळीं करणें भाग होते. पण कुकने इतकें अवघड काम रात्रीच्या अंधारांत इतक्या हिमतीने पार पाडलें कीं, कॅप्टन वगैरे मंडळी बहोत खूष होऊन गेली. रात्रीमागें रात्र हें काम चाललेले होतें, पण शत्रूंना त्यानें दाद लागूं दिली नाहीं. पण शेवटी शेवटीं फ्रेंचांच्या हें ध्यानात आलें; आणि त्याला पकडण्यासाठीं कांहीं इंडियन लोकांना त्यानीं पाठाविले. या लोकांचीं होडगी आता आपल्याला घेरणार, हें दिसूं लागताच, कुकनें आपलीं नाव आइल ऑफ ऑरलिन्सकडे वळवली; आणि जोराने सूं केलें. पाठीवर, त्या इंडियनाची होडगीं येतंच होतीं. शेवटीं, जमीन दिसूं लागताच, त्याची नांव थांबण्याची वेळ आली तों नावेच्या मागल्या टोकाने ते इंडियन लोक त्याला धरण्यासाठीं त्याच्या नावेवर चढले देखील ! इतक्यांत पुढल्या टोकाने कुकनें जमिनीवर उडी टाकली आणि त्यांच्या तावडीतून तो निसटला. जयाचें चिन्ह म्हणून त्या वेड्या लोकांनी त्याची नावच पळवून नेली !

आतांपर्यंत, कुकला रेखाकलेची माहिती बिलकुल नव्हती. परन्तु, आपण पत्करलेल्या उद्योगाला, या कलेचे ज्ञान अवश्य आहे, हें पाहून, त्यानें फावल्या वेळीं, तिचा अभ्यास सुरू केला. आणि, हें ज्ञान पुरेसें हस्तगत केल्यावर, त्यानें सेट लॅरेन्स नदीचें एक मानचित्र ( नकाशा ) तयार केलें. त्या चित्रांत कोठें किती खोली आहे, कोठें उथळ पाणी आहे, कोठें खडक आहेत, हे सारें बारकाईने दाखविलें होतें. कुकचा हा नकाशा पाहून, वरिष्ठांना नुसता संतोषच झाला नाही, तर आपल्या हाताखाली, एक फार बुद्धिमान, सचोटीचा कर्तबगार माणूस आहे, याचा त्यांना नवाच प्रत्यय आला.

सेंट लॅरेन्स नदी फार रुंद आणि लांब आहे. या सर्वच नदीच्या

पात्राची आणि त्यातल्यात्यांत क्वेबेक्च्या आसपासच्या टापूची पाहणी करण्याचें आणि त्याचें मानचित्र काढण्याचे काम वरिष्ठांनी त्याच्याकडे दिलें. हेंही काम कुक्ने तितक्याच कुशलतेनें आणि तडफेनें करून दाखविलें. नकाशा तयार होतांच, कप्तानानें तो छापून घेतला. आणि मग आरमारांतले सर्वच अधिकारी म्हणूं लागलें की, ‘ लॉरेन्स नदीचे आतांपर्यंत झालेले सर्वच नकाशे आपण आता रद्दीतच फेकून दिले पाहिजेत.’

कॅनडा देश जिकल्यावर, अर्थात्‌च ज्यांनीं ज्यांनीं महत्त्वाचीं कामें केलीं होतीं, त्याना एकदम बढती मिळाली. कुक् याला १७५९ त लॉर्ड कोलव्हिल याच्या हाताखालीं, एका जहाजाचा कप्तान म्हणून नेमण्यांत आलें. कोलव्हिल हा लवकरच कुक्‌चा मित्र बनला. आता कुक् याला असें वाटूं लागलें कीं, जर समुद्रावर हिंडावयाचें, तर भूमिति आणि खगोलशास्त्र याचें ज्ञान असणे अवश्य आहे. मिळण्यासारखीं सर्व पुस्तकें त्यानें जमा केलीं; आणि कोणी गुरु नसतानाच, त्याने या विषयाचा पुष्कळच खोल अभ्यास केला. १७६० त एका स्वतंत्र जहाजावर त्याची नेमणूक झाली. १७६२ च्या सप्टेंबर महिन्यांत न्यू फाऊंडलंड बेटावर इंग्रजांनीं चढाई केली, तेव्हा त्याही कामांत कुक्ने आपलें शौर्य आणि बुद्धि हीं दोन्हीं प्रकट केलीं. याचवेळीं, या बेटावरील, बंदरांची आणि डोंगरांची पाहणी त्यानें केली. हळूंहळूं ॲडमिरल् ग्रेव्हज् याच्या ध्यानात येऊं लागलें कीं, कुक् हा एक फार कोणीतरी अलौकिक बुद्धीचा माणूस आहे. त्यानें आपण होऊन त्याचा स्नेह संपादन केला; आणि नवलाची गोष्ट ही कीं, कुक्‌विषयीं त्याचे मत अधिक अधिकच चांगलें बनत गेलें. केवळ ज्ञानाचा हव्यास म्हणून उत्तर अमेरिकेचा सर्व किनारा जलपर्यटनाच्या दृष्टीनें त्यानें तपासून पाहिला आणि मग तर, सर्वच आरमारांतील अधिकारी–वर्गानें त्याची मोठीच वाहवा केली.

१७६२ त लेफ्टनंटची जागा मिळवून कुक् इंग्लंडांत परत गेला. आणि लवकरच बॅटस् या नावाच्या एका स्त्रीशी त्यानें लग्न केले. या बॅटस-वर त्याचें अतिशय प्रेम होते. तथापि, सांसारिक सुखाचा अखंड उपभोग घेण्याला त्याचा धंदा अनुकूल नव्हता. मधूनमधून त्याला सारखें परदेशी जावें लागे. मात्र, असले व्यत्यय सोडले तर, त्याच्या प्रपंचाचें सुकाणूं सुद्धां चागल्या तऱ्हेनें चालत होतें.

१७६३ त युद्ध संपलें आणि दर्यासारंग प्रेव्हज् याला न्यू फाऊंडलंडचा मुख्य शास्ता म्हणून रवाना करण्यात आले. या बेटाची एक निराळीच किमत होती. याला व्यापारी महत्त्व फार होते आणि म्हणून अँग्लो फ्रेंचांची नेहमीच वासाघीस चालूं असे. प्रेव्हज्च्या मनात आले की, व्यापारी दृष्टी-नेच या बेटाचा सर्व किनारा पारखून पहावयास हवा. म्हणून सरकारात पुन्हा पुन्हा लिहून त्याने लेफ्टनन्ट कुक्ची नेमणूक या कामावर करवून घेतली. हे पाहणीचे काम यथायोग्य करून, कुक् इंग्लन्डला परत आला. १७६४ त, न्यू फाऊन्डलन्ड आणि लॅब्राडोर, यांचा खलाशी देखरेख-नवीस म्हणून त्याची नेमणूक झाली; आणि पुन्हा किनारा-पाहणीचें काम त्यानें पहिल्यासारखेच चालूं केलें. यावेळी त्याने तयार केलेले नकाशे पाहून अधिकारी लोक सन्तुष्ट होऊन गेले. पण आतां या बेटाच्या काठाकाठानें हिंडण्यानेच त्याचे समाधान होईना. तो त्या बेटाच्या आत शिरला. आणि १७६७ पर्यंत, त्यानें या बेटाच्या आतील प्रदेशाची उत्तम पहाणी केली. दरम्यान, सर विल्यम बर्नार्बी याच्याबरोबर तो एकदा जमेका बेटालाही जाऊन आला.

लवकरच त्याने खगोलाच्या माहितीवर एक प्रबंध लिहिला. न्यू फाऊन्ड-लन्ड बेटात, १७६६ सालच्या ऑगस्ट महिन्याच्या पाच तारखेस सूर्य-ग्रहण लागले होतें. त्यावर त्याने हा प्रबन्ध लिहिला होता. या प्रबन्धानें

त्याला गणिती म्हणूनही कीर्ति मिळवून दिली; आणि या माणसाचा उपयोग आता काही निराळ्या कामासाठी करून घेतला पाहिजे, असें सरकारांत वाटूं लागलें. आता युद्ध संपून जिकडे तिकडे स्थिरस्थावर झालें होतें; आणि भूमीचा शोध करण्याची नवी उर्मि लोकांना पुन्हां आली होती. अनेक दर्यावर्दी लोक निरनिराळ्या महासागरांत भ्रमन्ती करूं लागले होते. पण, समुद्राचा विस्तार आणि आकाशाचें प्रांगण याचा निकटचा सम्बन्ध असल्यामुळें, खगोल शास्त्राच्या अभ्यासाकडे लोकांची दृष्टी वळली. पंचांगकर्त्यांनीं याचवेळीं प्रसिद्ध केलें कीं, १७६९ त, शुक्राचा तारा सूर्यबिंब ओलांडून जात आहे. हा चमत्कार नेहमीच घडतो असें नाही. म्हणून हें संक्रमण होत असताना, त्याचें प्रत्यक्ष निरीक्षण करणें अवश्य आहे, हें इंग्लन्डचा तेव्हाचा राजा तिसरा जॉर्ज यालाही पटलें. बरीच भवति न भवति होऊन, मार्क्विसास या ठिकाणीं किंवा फ्रेंडली आइल्स या नांवाच्या बेटावर हे निरीक्षण फार चांगल्या तऱ्हेनें करतां येईल, असा विद्वानांचा अभिप्राय पडला. विद्वानांनी शिफारस केली, आणि राजानें संमति दिली कीं, सर्व साधनानीं सुसज्ज केलेले एक जहाज एका हुषार अधिकाऱ्याच्या हाताखाली तिकडे पाठवून द्यावे. हा अधिकारी म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून, कुक् हाच असणार, हे आतां ठरल्यासारखें झालें होतें. पुढे कॅप्टन वॅलिस यानें अशी शिफारस केली की, किंग जॉर्जेस आयलन्ड या बेटावरील पोर्ट रॉयल हार्बर हें ठिकाण, या संक्रमणाच्या निरीक्षणाला जास्त अनुकूल आहे. अर्थात् कॅप्टन् कुक् यानें तिकडेच जावयाचें ठरविलें. मुख्य काम जरी शुक्राच्या संक्रमणाचें अवलोकन हें होतें तरी, तिकडील सर्व समुद्राची कुक्नें पहाणी करावी व नवे नवे प्रदेश हुडकुन काढावे, असेंही काम त्याला सांगण्यांत आलें. १७६८ च्या ऑगस्ट महिन्यात कॅप्टन कुक्ने आपले जहाज हांकारलें.

१३ सप्टेंबरला तो मदिरा बेटांत आला आणि तेथली ती फळझाडांची शोभा, पिकांची लागलेली थाप, आणि खेळकर हवा, हीं पाहून त्याला फारच आनंद झाला. जातां जातां नोव्हेंबर १३ला त्याचें जहाज रिओ-डी-जेनिरा येथें आलें. ब्राझिल देशाच्या पूर्व किनाऱ्यावर हें एक मोठें सुंदर बंदर आहे. परन्तु, इतक्या वर्षांपूर्वी त्याला आजची शोभा नव्हती. आणि तेथील अधिकारीही फारसे भले लोक नव्हते. या बन्दरांत उतरतांना, पुष्कळच कटकटी झाल्या. परंतु कुक् यानें हें सारें गोडीनें निभावून नेलें. या स्थळाचें तेव्हां केलेलं वर्णन आजही वाचण्यासारखें आहे.

" येथील पुरुष खेचराच्या गाड्यांतून हिंडतात आणि बायका मेण्यांतून जातात. निग्रो लोक हे मेणे आपल्या खांद्यावरून नेतात. वैद्यबुवांच्या दवाखान्यातच कॉफीपानाची व्यवस्था केलेली असते; आणि सगळ्या गावांत एकही माणूस भीक मागतांना दिसत नाहीं. पोर्तुगीज आणि स्पॅनिश वसाहतींतील स्त्रिया वर्तनानें थोड्या ढिल्याच असतात. येथली हवा अतिशय आनंदकर असते आणि कोणाच्याही प्रकृतीला छान मानवते. नारिंगें, संत्रीं, लिंबें, आंबे, नारळ, कलंगडीं इत्यादि फळांची इकडे रेलचेल आहे आणि येथल्या खाणीही चांगल्या समृद्ध आहेत. मात्र एका गोष्टीचें फार वाईट वाटतें. चाळीस हजार निग्रो लोक दरवर्षी या खाणी खणण्याच्या कामावर लावतात. या कामांतील श्रमानें आणि दुर्गंधीनें हे गरीब निग्रो पटापट मरतात आणि त्यांची जागा भरून काढण्यासाठीं, पुन्हां हजारों निग्रोंना धरून आणून तेथें पाठवण्यांत येतें."

रिओ बन्दरांतून डिसेंबर ८ ला कुक्चें जहाज बाहेर पडलें; आणि १३ तारखेला रात्रीं, चन्द्रग्रहणाचा देखावा त्यांनीं पाहिला. जानेवारी १५ ला कॅप्टन कुक् हा बे ऑफ गुड सक्सेस येथें येऊन पोहोंचला आणि किनाऱ्यावरील तद्देशीयांची कुक्नें ओळख करून घेतली. कुक्नें त्यांना

थोडेसे कपडे दिले आणि कांही खावयासही दिलें. दारु पुढें ठेवतांच, त्या रानटांनीं खुणेनें सुचविलें कीं, ही दारु आम्हांला नको, कारण यानें आमचे घसे सुजतात. हे लोक मध्यम उंचीचे असून, त्यांचीं कपाळें अरुन्द आणि चेहरे थवकट आणि रुंद होते. गालाचीं हाडें वर आलेलीं असून नाकें बस्कट आणि नाकपुड्या फारच पसरट होत्या. यांचे डोळे काळे आणि बारीक असून, जिवण्या लांब होत्या. दांत बारीक बारीक आणि आंत बाहेर झालेले असून, केस काळे आणि सडक होते व ते त्यांच्या गालफडांवर आणि कपाळांवर आलेले होते. विशेष म्हणजे या लोकांना दाढीच नव्हती.

या ठिकाणीं थंडीचा कडाका इतका विलक्षण होता कीं, जहाजांवरील माणसांना थोडीशी मरगळ येऊन, आपोआपच झोप लागूं लागली. म्हणून कप्तानानें हुकूम सोडला कीं, कांहीं तरी जोराची हालचाल चालूं ठेवा. जो कोणी बसून राहील त्याला झोंप लागेल; आणि ज्याला झोंप लागेल तो पुन्हां जागा होणार नाहीं !

एप्रिलच्या १० तारखेला किंग जॉर्ज आयलंड या बेटावर ते आले. मात्र तद्देशीय लोक या बेटाला ओताहिट असें म्हणत असत. या ओताहिट बेटावर, कॅप्टन कुक् आणि त्याच्याबरोबरचे इतर अधिकारी यांनीं तद्देशीयाची पुष्कळच माहिती करून घेतली आणि कांही थोड्यांची मैत्रीही संपादून घेतली. या बेटावर कांहीं दिवस मुक्काम व्हावयाचा असल्यांमुळें एक लहानसा भुईकोट किल्ला बांधण्याचें काम कुक्नें सुरूं केलें. इंडियनांनीं म्हणजे तद्देशीय लोकांनीं यांना मनापासून मदत केली. या पाहुण्यांना भाकरीचीं फळें आणि नारळ यांची अगदीं लयलूट या लोकांनीं करून दिली आणि त्यांच्या करमणुकीसाठीं त्यांनीं थोडें गाणें-बजावणेंही केलें. विशेष गोष्ट म्हणजे याच्यांतला पिपाणीवाला आपली

पिपाणी तोंडानें वाजविण्याऐवजी नाकानेंच वाजवीत होता ! हे सारें ठीक झाले. पण, जहाजावरील लोकांना लवकरच कळून आलें की, हे लोक चोरटे आहेत. एकादा खिळा किंवा एकादा आकडा दिला म्हणजे हे लोक खूष होऊन जात आणि फळाची पाटी पुढें आणून ओतीत ! एकदां मात्र असें झालें कीं, जहाजावरच्याच एका खलाशानें एक चोरी केली. तो तेथल्या एका बाईला म्हणाला कीं, ही दगडाची केलेली फरशी—कुऱ्हाड जर मला विकत दिली नाहीस, तर मी तुझा गळा कापीन. असें म्हणून, ती फरशी तो घेऊन आला. गुन्हा उघडकीस आल्याबरोबर त्या सर्व रानटाच्या समोर कॅप्टन् कुक्‌ने आपल्या त्या खलाशाला चाबकाखालीं झोडपून काढलें.

पुढें एकदा या लोकांच्या प्रमुखाची म्हणजे राजाची बायको पाहुण्यांना भेटावयास आली. राणीसाहेब सरासरी.चाळीस वर्षांच्या असाव्या. ही बाई अंगानें भली आडवी तिडवी आणि उंच होती. ती रंगानें गोरी—पांढरी होती. तिचे डोळे पाणीदार होते. तरुणपणीं ती चांगलीच सुंदर असली पाहिजे. आपल्या परिचारिकासह राणीसाहेब जहाजावर आल्या, तेव्हां त्याना नजर म्हणून इतर कांहीं वस्तूंबरोबर खेळांतली एक सुंदरशी बाहुलीही कुक्‌नें दिली; आणि राणीसरकार त्या बाहुलीकडेच बघत बसल्या. कांहीं वेळानें कॅप्टन कुक् त्यांना परत पोहोंचवावयास गेला. तेव्हां, राणीसरकारनीं त्याला केळांचे कांहीं घड दिले; आणि एक डुक्करही नजर केले ! एकदां असें झाले कीं, त्यांच्यांतला एक इंडिअन सारखा ओकूं लागला कुक्‌च्या लोकांनीं तपास केला तेव्हा कळलें कीं, तंबाखूचें एक पान त्यानें खाल्लें आहे. ताबडतोब, जहाजावरच्या बँक या अधिकाऱ्यानें सांगितलें की, नारळाचें दूध काढून याला पाजा. तें पाजताच हा गृहस्थ खडखडीत बरा झाला.

मे महिन्याच्या ११ तारखेला त्या रानटी लोकांनी खगोलाचें अवलोकन करण्याचें कॅप्टन्चें एक यंत्रच चोरून नेलें. अर्थात्च कुक्‌ला मोठें कडक रूप धारण करावें लागलें. हे झाल्याबरोबर यंत्र आपोआप घरीं परत आलें! मग कांहीं दिवसांनी कॅप्टन् कुक् तेथील राजाच्या भेटीला गेला. नजर म्हणून त्यानें राजेसाहेबांना एक पैरण आणि एक पांच हात लांबीची पंजी दिली! राजेसाहेब एका झाडाखाली बसले होते. आणि त्यांच्या भोवती कांहीं म्हातारे उभे होते. नजराणा बघून, राजेसाहेबांची मुखश्री प्रफुल्लित झाली; आणि मग, पाहुण्याच्या करमणुकीसाठीं राजेसाहेबांनी कुस्त्यांचा फड भरवला. इतक्यांत वर्दी आली कीं, डुकरें शिजवून तयार झालेलीं आहेत; आणि भाकरीचीं फळेंही येऊन पोहोचलीं आहेत. मेजवानीची पंगत उठल्यावर, कॅप्टन् कुक्च्या लोकांनी हत्यारें नीट करण्यासाठीं लावलेला घिसाड्याचा भाता पहावयास राजेसाहेबांची स्वारी गेली. पाहुण्याच्या नांवाचा उच्चार करणे या लोकाना फार जड जाऊं लागलें. ‘ कुक् ’ ला ते ‘ टुट् ’ म्हणूं लागले; ‘ हिस्क ’ याला ‘ हिट् ’ म्हणूं लागले; ‘ गोऑर ’ याला ‘ टोऑर ’ म्हणूं लागले; सोलॅन्डरचें ‘ टोलेनोर ’ झालें; आणि ‘ ग्रीनचें ’ ‘ ट्रीन ’ बनलें! असो. अशा प्रकारें परस्परांच्या ओळखी झाल्यानंतर, शुक्राचें संक्रमण पारखण्याच्या त्यांच्या तयाऱ्या सुरू झाल्या. काही उपकरणें नव्यानेंच करावयास हवीं होती; आणि जीं आधींच हाताशीं होतीं, त्यांचा उपयोग कसा करावयाचा, हें लोकांस शिकवावयास हवें होतें. या बेटाच्या आसपासही विशेष अनुकूल जागा कोठें सांपडते कीं काय, याचाही शोध त्यांनीं चालू केला. होतां होतां, तयार झालेल्या वेधशाळेवर सर्वजण जमा झाले; आणि मग, कुक् यानें राजेसाहेबांना आपण कशासाठीं आलों आहों हें समजावून सांगितलें. सकाळच्या प्रहरीं सूर्यबिंबाचा आणि शुक्राचा पहिला संपर्क झाला. त्यावेळी ९ वाजून २५ मिनिटें व ४ सेकंदें झालीं

होती. ९ वाजून ४४ मिनिटें व ४ सेकंदें झालीं तेव्हां शुक्राचें बिंब सूर्य-बिंबांत पूर्णपणें मग्न झालें. दुपारीं ३ वाजून १४ मिनिटें आणि ८ सेकंदें होतांच शुक्र बिंब सूर्यबिंबांतून बाहेर पडूं लागलें; आणि ३२ मिनिटें व १० सेकंदें होतांच, तें सूर्यबिंबांतून पूर्णपणें बाहेर पडलें. हें निरीक्षणाचें काम अतिशय समाधानकारक झालें. म्हणजे ज्या कामासाठीं कुक् याला तिकडे धाडण्यांत आलें होतें, त्यांतील एक काम त्यानें पार पाडलें. तें आटोपून परत येतांना, नव्या नव्या प्रदेशांचा शोध लावणें, हें दुसरें काम त्याच्याकडे दिलेलें होतें; व तें आतां त्यानें सुरू केलें.

जून महिन्याच्या २६ व्या तारखेस कुकनें आपलें जहाज पुन्हां हांकारलें. तें पश्चिम दिशेच्या रोखानेंच चालले होते; पण पुढें पुढें जावें, तसतसें ते पूर्व दिशेला येऊन पोहोंचत होते. वाटेंत त्यांना कितीतरी बेटें लागलीं. परंतु, बहुतेक सारे रानटी लोक चालीरीतीच्या आणि आहारविहारांच्या बाबतींत इथून तिथून सारखेच आहेत, असें कुकूला दिसून आलें. त्याच्या लोकांपैकीं कांहीं लोक, ओताहिट बेटावरच मागें राहून गेले. त्यांचा पाय तेथून निघेना; कारण तेवढ्यांतल्या तेवढ्यांतच, तेथील रानटी बायकांशीं त्यांनीं लग्नें लावून घेतलीं होतीं ! तुपिथा या नांवाचा एक त्या बेटा-वरचा माणूस त्यांनीं आपल्याबरोबर घेतला होता. त्याला यांची संगति फार आवडली; आणि तो त्यांच्याबरोबर जावा बेटाच्या पुढेपर्यंत गेला.

जुलैच्या १३ तारखेला, त्यांना एक मोठें बेट लागलें. येथील रहिवासी युरोपियन लोकांच्यापेक्षां मोठाड दिसले. पुरुष लोक चांगले उंच, दांडगे, आणि सुंदर बांध्याचे दिसले. त्यांच्यांतील वरिष्ठ लोकांच्या बायका, इंग्लंडां-तील सामान्य बायकांपेक्षा मोठ्या दिसल्या. त्यांचा वर्णही चांगला तुक-तुकित असून त्वचा चांगली मृदु, आणि गोजिरवाणी दिसली. त्यांची मुखश्री सुंदर असून, डोळ्यांवरून पाहतां हीं माणसें फार शहाणी आहेत

असें वाटे. दांत तर विलक्षण शुभ्र असून, त्यांच्या श्वसनाला, कसलाही वाईट वास येत नव्हता. यांच्यांत एक मोठी चमत्कारिक चाल आहे. पुरुष आणि बायका हीं तर एकमेकापासून जेवणाच्या वेळीं निराळीं बसतातच; पण बहीण भावाचें सुद्धां भाकरीचें टोपलें निराळें असतें; आणि ते एकमेकाकडे पाठ करून जेवावयास बसतात ! जेवणाच्या आधीं आणि नंतर ते चुळा भरून टाकतात; आणि दिवसांतून तीन वेळां स्नान करतात. आजाऱ्याची शुश्रुषा करण्याचें काम उपाध्येबोवांकडे असतें; आणि त्यांचें औषध म्हणजे देवाला प्रार्थना करणें हें होय. रोगी बरा होईपर्यंत, किंवा मरेतोंपर्यंत प्रार्थनांचा तडाखा सुरूं असतो. लग्न म्हणजे स्त्रीपुरुषांचीं केवळ संमति येवढेंच असतें. परस्पर-संमति असली म्हणजे लग्न होतें; आणि कांहीं थोडेसें बिघडलें, तर काडीमोड होते. लग्न किंवा काडीमोड यान्त्रा कसलाही गाजावाजा नसतो.

ऑक्टोबर २९ ला ते ईस्ट आयलंड या बेटावर आले. कॅप्टन कुकनेंच हें नांव त्या बेटाला दिलें. कुकने येथें कांहीं दिवस मुक्काम करावयाचें ठरविलें. कारण, मंगळाचें संक्रमण ( Transit of Mercury ) येथें चांगलें दिसणार होतें. बोटीवरचा खगोलशास्त्रज्ञ ग्रीन यानें हें संक्रमण फार बारकाईनें पाहिलें; या प्रसंगानिमित्तानें येथील उपसागराला त्यांनीं ‘ मर्क्यूरी बे ’ असें नांव दिलें.

१७६९ च्या डिसेंबरच्या १६ व्या तारखेला न्यूझीलंडच्या अगदीं उत्तर टोकापाशीं ते येऊन पोहोंचले; आणि ३, जानेवारी १७७० पर्यंत पूर्व दिशेनें गेल्यावर त्यांना पुन्हां एकदां जमीन लागली. याचा अर्थ असा कीं, न्यूझीलंडबेटाचे निरनिराळे कंगोरे त्यांना लागत होते. मार्चच्या ५ तारखेला त्यांना एक भला मोठा खडक लागला. याचा घेर एक मैल असून, याचा कडा फार उंच गेलेला होता. याला, सोलॅन्डरचें बेट असें

नांव कुकनें दिलें. इंग्लंडला कोणच्या दिशेनें जावें, याचा विचार या ठिकाणीं ठरविण्यांत आला; आणि येता येतां, ते केप फेअरवेल येथें येऊन पोहोंचले.

आतां ते न्यूझिलंड बेटांत आलेले होते. हा प्रदेश, अरण्यमय असून त्यांतील झाडें फार मोठीं, सरळ आणि उंच दिसलीं. निरनिराळ्या तऱ्हेच्या ४०० वनस्पती त्यांना येथें आढळल्या; आणि यांतल्या फारच थोड्या त्यांना ओळखीच्या वाटल्या. येथील लोक कोणत्याही भक्कम आणि पुष्ट युरोपियानांपेक्षां अंगानें जास्त मोठे दिसले, आणि त्याचा रंग भुरा होता. स्त्रियांच्या अंगीं मार्दव कमी दिसलें. मात्र त्यांचा आवाज अतिशय कोमल होता. युरोपांतील कोणच्याही लोकांइतकेंच हे लोक विनयशील दिसले आणि बोलण्याचालण्यांत ते थोडा संकोच दाखवितात. हे आपल्या अंगावर रंगवेलीचीं नाना प्रकारचीं चित्रें काढतात; आणि बायका, आपल्या केसांचा बुचडा टाळूवर बांधतात. सर्वच माणसे कान टोंचतात; आणि कानांची भोकें येवढी मोठी ठेवतात कीं, त्यांतून माणसाची करंगळी जावी. यांचीं शस्त्रें म्हणजे भाले, कुऱ्हाडी हींच होत. यांच्या नाचाचें रूप हिडिसच असतें. एक सर्व श्रेष्ठ देव आणि त्याच्या खालच्या अनेक देवता हे लोक मानतात.

२७ मेला ते केप मॅनिफोल्ड येथें आले; आणि येथें काहीं दिवस मुक्काम करून जहाजाची साफसुफाई करण्याचें कुक्नें ठरवलें. ट्रिनिटि उपसागरात आल्यावर, त्यांना आढळून आलें कीं, आपण आतांपर्यंत १३०० मैलांचा प्रवास केलेला आहे. येथून पुढें गेल्यावर त्यांच्यावर एक मोठा चमत्कारिक प्रसंग गुदरला. समुद्राच्या सपाटीला मोठमोठाले खळगे पडल्यासारखे झाले; आणि आपण त्यांत सांपडत आहों असें त्यांना स्पष्ट दिसूं लागले. यांतून ते बाहेर पडतात तोंच, जहाजांत कोठून तरी पाणी शिरूं लागले. आणि पंपानें हें उपसून काढण्याच्या कामीं जहाजावरील

झाडून सारीं माणसें अगदीं एकमेला आलीं. पाणी कोठून येतें, हेंही नीटसें कळेना. सुदैवानें लवकरच समुद्राला ओहोटी लागली; जहाजाचीं खालची बाजू मोकळी झाली. तेव्हा त्यांना दिसून आलें कीं खडकांना घासल्यामुळें, कांहीं फळ्या पिचून गेलेल्या आहेत. परन्तु, जहाजांत पाणी जरी येत होतें तरी एका निराळ्याच आकस्मिक कारणामुळें आपलें जहाज बुडालें नाहीं, हे त्यांच्या ध्यानीं आलें. पिचलेल्या फळ्यांच्या एका मोठ्या भोकांत, एक खडकाचा मोठासा कपरा, अलगद जाऊन बसलेला होता, आणि म्हणून, भरतीचें पाणी आत येऊं शकलें नाहीं. नाहीं तर आठ पंप चालवून सुद्धां त्यांचें जहाज केव्हांच बुडालें असतें. याच ठिकाणीं त्यांनीं कांगारू हा पशु पाहिला. आणि त्याचें मांसही त्यांना फार आवडलें. लोक इतके असंस्कृत, अज्ञानी आणि चरबट होते कीं, ते या युरोपियन लोकांच्याकडे नुसते बघतच बसत असत. एकदां तर त्यांच्यापैकी एकानें एका खलाशाचे हात चाचपून पाहिले; आणि त्याच्या तोंडावरूनहीं त्यानें हात फिरवून पाहिला. आपल्या सारखाच हा हाडामासाचा केलेला आहे, हें पाहून त्याला नवल वाटलेसें दिसलें. या भूमींतून बाहेर पडून बराच जलप्रवास झाल्यावर, त्यांचें जहाज एका खडकाकडे वेगानें गेलें. पाण्यांत पडलेल्या खळग्यानें तें तिकडे जाऊं लागलें. जहाज खडकावर जोरानें आपटून, आतां आपण सर्वजण मरून जाणार, हें त्यांना स्वच्छ दिसूं लागलें. इतक्यांत, उलट दिशेनें वारा येऊं लागला; आणि त्यांची बोट तिरप्या दिशेने चालूं लागली. अर्थात्च ती खडकावर आपटली नाहीं. आपण मरणाच्या तोंडांतूनच परत आलों, हें सर्वांना कळून आलें. २१ तारखेला यॉर्क आइज या नांवाची बेटें त्यांना लागलीं; आणि सामुद्रधुनी रुंद होत चाललेली आहे असें त्यांना दिसून आलें. कुकनें असा चुकीचा अंदाज केला कीं, आपण लवकरच हिंदी महासागरांत प्रविष्ट होणार. येथें कॅप्टन

कुकनें इंग्लंडची ध्वजा उभी केली; आणि त्या सर्व प्रदेशाला न्यू साऊथ वेल्स असें नांव दिलें. न्यू हॉलंडचें उत्तरटोंक त्यांनीं आतां गांठलें होतें. न्यू साऊथ वेल्स हा प्रदेश वाटला होता त्यापेक्षां फार मोठा आहे, नव्हे, हा युरोपपेक्षांसुद्धां मोठा आहे, हें कॅप्टन कुक यानें २००० मैलांचा घेरा घालून दाखवून दिलें.

येथील माणसें हाडापेरानें मजबूत, मध्यम बांध्याची असून त्यांचा आवाज अतिशय मृदु लागला. किंबहुना तो बायकांच्या आवाजासारखाच वाटला. त्यांच्या कातडीचा रंग, चॉकोलेटसारखा असला, तरी ते घाणीनें इतके बरबटलेले असत कीं, निग्रोसारखेच वाटावे. त्यांचा मुख्य दागिना म्हणजे नाकांतून इकडून तिकडे खुपसलेलें हाडूक हें होय. लाकडें एकमेकांवर घांसून विस्तव उत्पन्न करण्याची कला त्यांना माहीत झालेली होती. न्यू हॉलंड सोडतांना कुक् म्हणतो कीं ' न्यू हॉलंडचा, म्हणजे ऑस्ट्रेलियाचा पूर्वकिनारा, ३८ अक्षांशापासून तों खालीं एंडेव्हर सामुद्रधुनीपर्यंत, माझ्या पूर्वी कोणाही युरोपियनानें पाहिलेला नव्हता. म्हणून, आमच्या तिसऱ्या जॉर्जच्या नांवानें मी इंग्रजांच्या ध्वज येथें उभा केला; बंदुकांच्या तीन फैरी झाडल्या; आणि न्यू साउथ वेल्स या नांवानें मोडणारा सर्वच्या सर्व पूर्व किनारा, त्यांतील उपसागर, बंदरें, नद्या, बेटें, यांसकट, राजेसाहेबांच्या नांवानें हस्तगत झाल्याचें जाहीर केलें. '

ऑक्टोबर २ ला जावा बेटाच्या किनाऱ्याकडे कुकचें जहाज येऊन पोहोंचलें. दहा तारखेस ते या बेटांत आले. येथें डचांचें साम्राज्य होतें. आणि युरोपियन संस्कृतीचा प्रसारही पुष्कळ झालेला होता. त्यांच्या-बरोबर आलेल्या तुपी नांवाच्या त्या इंडियनानें हें युरोपियन संस्कृतीचें वैभव पाहिलें, तेव्हां तो अगदीं विस्मित होऊन गेला. या ठिकाणीं, कुकच्या जहाजावर रोगराई फार पसरली; परन्तु डच अधिकाऱ्यांनीं औषधपाण्याची

सर्व तरतूद केली. तेथून एंडेव्हर जहाज प्रिइन्सेस आयलंडकडे गेलें. आतां ते हिंदी महासागरांतच उतरलेले होते. येथून पुढें नैऋत्येच्या रोखानें ते आफ्रिकेच्या दक्षिण किनाऱ्याकडे गेले; आणि १७०१, मार्च १५ ला केप ऑफ गुड होप येथें त्यांनीं मुक्काम केला. यावेळीं केप टाऊन हें लहानसेंच गांव होतें. तथापि, कुकच्या माणसाची बडदास्त येथें बरी राहिली. १४ एप्रिलला, त्यांनीं हे केप सोडलें, आणि मे महिन्याच्या आरंभीं ते सेंट हेलेना या बेटात येऊन पोहोंचले. आतां त्यांना घराची ओढ लागलेली होती. वाटेनं फारसें कांहीं घडलें नाहीं. २२ जुलैला ते इंग्लंडच्या किनाऱ्याला जाऊन लागले. २ वर्षे ९ महिने १४ दिवसपर्यंत त्यांची ही सफर चालू होती.

कोलंबसानंतर इतकी नवी भूमि शोधून काढलेला दुसरा कोणीही दर्यावर्दी या वेळेपर्यंत झाला नव्हता. न्यूझीलंड देश दोन बेटांचा झालेला आहे, आणि ऑस्ट्रेलियाचा पूर्व किनारा किती विस्तीर्ण आहे, हें त्यानें दाखवून दिलें. परत येतांना इंग्लंडांतील पदार्थ–संग्रहालयासाठीं, त्यानें बरोबर आणलेल्या वस्तूंची यादी पाहिली म्हणजे त्याच्या जिज्ञासेची मौज वाटते. न्यूझीलंड व साऊथ सी आयलंडज् इकडील लोक जें कापड वापरीत त्याचे काहीं नमुने, कांही पेट्या, एक पीप, एक ड्रम, एक लाकडाचा परळ, पांच उशा, दोन स्कूपस, दोन दगडाच्या व दोन लाकडाच्या कुऱ्हाडी, एक माशांचा गळ, तीन खोदलेल्या मूर्ति, आठ खलबत्ते, कांहीं हाडांचीं शस्त्रें या वस्तू त्यानें बरोबर आणल्या होत्या.

कुकचा बाप यावेळीं अगदीं म्हातारा झाला होता. आणि त्यालाही कांहीं दुसरीं घरगुतीं कामें होतीं. म्हणून सरकारांतून कुकला तीन आठ-वड्यांची रजा मिळाली. येवढाले शोध करून तो परत आलेला असल्या-मुळें इंग्लंडांत त्याचें नांव सगळ्यांच्या तोंडीं झालें; आणि आपल्या

देशाच्या मालकीची येवढी विशाल भूमि त्यानें शोधून काढली हें पाहून तर आपल्या देशाचा हा एक फार मोठा उपकारकर्ता आहे, असेंच राजासकट सर्व लोक मानूं लागले.

लवकरच, इंग्लंडच्या सरकाराने दक्षिण गोलार्धाचा शोध पुरा करण्याची योजना केली. आतांपर्यंत दक्षिणेकडे बऱ्याच अंतरावर नावाडी लोक गेले होते, आणि ते सांगत असत कीं, दक्षिण ध्रुवाच्या रोखानें पुष्कळ खालीं गेलें तर, एकादें नवें खंड सांपडण्याचा संभव आहे. पृथ्वीच्या भोंवतीं, पूर्व-पश्चिम वळसा घालून झालेला होता; आणि हा वळसा घालतांना, एक नवें अमेरिका नांवाचे प्रचंड खंड, आणि ऑस्ट्रेलियासारखें खंडतुल्य बेट, यांचा शोध लागला होता. शेकडोंच्या शेकडों नवीं बेटें, सांपडलीं होतीं; आणि युरोपांतील सर्वच दर्यावर्दी राष्ट्रांत जोराची अहमहमिका उत्पन्न होऊन, नवी नवी भूमि हस्तगत करण्याची आकांक्षा सार्वत्रिक झालेली होती. पण या सर्व लोकांचे प्रयत्न विषुववृत्तापासून दक्षिणेकडे व उत्तरेकडे ४६ अंशाच्या पलीकडे फारसे उत्तरेकडे गेलेले नव्हते. त्यातही, दर्यावर्दी राष्ट्रें उत्तरेकडील शीत कटिबंधाच्या जवळ असल्यामुळें त्यांना त्या बाजूची माहिती बरीच झालेली होती. परंतु दक्षिणेकडील शीत कटिबंध अजून अज्ञातच राहिलेला होता. कोणी कोणी नावाडी म्हणत की, हिंदी महासागरांतून खूप खालीं गेलें म्हणजे, नवी भूमि सांपडलीच पाहिजे. त्यांच्या या म्हणण्याचा पडताळा पाहण्याचें काम इंग्लंडनें हातीं घेतलें व रेझोल्यूशन व ॲड्व्हेन्चर अशीं दोन जहाजें त्यांनीं तयार केलीं. जहाजांची रचना शीत कटिबंधांतील जलप्रवासाला योग्य अशीच बनविली होती. आणि तेव्हांच्या काळीं उपलब्ध असलेल्या सर्व सुखसोईंनीं तीं सुसज्ज केलेलीं होतीं. आडमुलखांत आणि आडसमुद्रांत जावयाचें असल्यामुळें, तोफा, दारुगोळा, हीं बरोबर देणें अवश्यच होतें. महिनोमहिने समुद्रां-

तून जावें लागणार असल्यामुळे, गोड्या पाण्यासाठीं पाण्याची मोटाली टाकी ठेवणेही भाग होते. आणि सर्वांच्या वर म्हणजे, ज्या समुद्रात अजून मानवप्राणी कधी फिरकलाच नव्हता, त्या समुद्रांत जावयाचें असल्यामुळे सर्व अधिकारी आणि खलाशी जाणते, हुषार, सोशिक, आणि शूर असेच निवडणे प्राप्त होते. रेझोल्यूशन जहाजावर, कॅप्टन् कुकची नेमणूक झाली आणि ॲडव्हेनचर जहाज कॅप्टन फर्नो याच्याकडे देण्यांत आलें. रेझोल्यूशन जहाजावर सगळे मिळून ११२ लोक होते, आणि ॲडव्हेन्चरवर ८१ होते. फोस्टर आणि त्याचा मुलगा हे दोघे सृष्टिविज्ञानशास्त्री आणि वेल्स हा एक गणिती, हे ही अभ्यासाची सोय म्हणून यांच्या बरोबर निघाले. कॅप्टन् कुक् हा १७७१ च्या जुलैच्या १२ तारखेला पहिली सफर संपवून इंग्लंडांत परत आलेला होता. बरोबर १ वर्षाने म्हणजे १७७२ च्या जुलै १३ ला तो दुसऱ्या सफरीला बाहेर पडला.

पहिला मुक्काम २९ तारखेस मदिरा बेटावर पडला. पाणी घेण्यासाठी ऑगस्टच्या १० तारखेला ते सेंट यागो बंदरावर उतरले. आणि ऑक्टोबर २९ ला केप ऑफ गुड होपला आले. टेबल माऊंटन या नांवाचा जो एक पर्वत केप टाऊनच्या शेजारी दिसतो, त्याचें दर्शन त्यांना झालें. पण ढग आलेले असल्यामुळें देखावा दिसावा तसा दिसला नाही. संध्याकाळच्या वेळी, दृष्टीच्या टप्यांत असलेला सारा समुद्र पेटलेला आहे असें त्याना दिसूं लागले. त्यांना हा देखावा नवीनच होता. मात्र स्थानिक लोक सांगूं लागले की, समुद्रातील फॉस्फरस असाच केव्हां केव्हा पेटतो.

आतां आपण गार हवेच्या मुलखांत आलो आहों हे पाहून बरोबर आणलेले लोकरी कपड्याचे गट्ठे कुकनें सोडलें; आणि खलाशाना ते घालावयास दिलें. फेब्रुआरी १ ला कॅप्टन् फर्नो यानें कुकला सांगितलें की, दगडावर उगवणारें बरेंचसें गवत समुद्रांत वहात येत असलेलें आपण

पाहिलें; आणि डोक्यावरून पाखरेंही उडतांना पाहिलीं; यावरून जवळच कोठेंतरी जमीन असावी. परंतु जमीन कोठेंच आढळली नाहीं. इतक्यांत एक मोठा चमत्कार घडून आला. फर्नोचें जहाज आणि कुकचें जहाज यांची ताटातूट झाली. दोन्हीं जहाजे अर्थात्च कांही अंतरानें चालत होतीं. परंतु ८ फेब्रुआरीच्या सुमारास, फर्नोचें जहाज कुकला दिसेनासें झालें. ताटातूट झाल्यासारखी वाटली तर, फर्नोनें असल्या जागीच तीन दिवसपर्यंत इकडे तिकडे करीत रहावें, असा कुकचा हुकूम होता. या संकेता प्रमाणें, कुकनें शोधून पाहिलें; परंतु फर्नोच्या वहानाचा पत्ता लागेना. दोघांनींही आपापल्या जहाजावरच्या तोफा उडवून पाहिल्या. परंतु, कोणाचाच माग कोणाला लागेना. शेवटी १७ मार्चला कुकनें ठरवलें कीं, आतां न्यूझीलंडला जावें आणि फर्नो तेथें भेटतो का पहावें. यावेळीं कुकनें दक्षिणेच्या बाजूला, जितका दूरवर प्रवेश करून घेतां येईल, तितका घेतला होता. आतांपर्यंत दक्षिण समुद्रांत इतक्या लांबवर कोणीही गेलें नव्हतें. या गार हवेंत, कुकच्या लोकांना, दातांचा रोग होऊं लागला. परंतु, स्वीट वार्ट नांवाचें एक बरोबर आणलेलें औषध त्यानें लावावयास देतांच, हा दातांचा उपद्रव एकदम कमी झाला.

कुकचें जहाज आतां डस्की उपसागरांत आलेलें होतें; तेथून तें चारलोटी सामुद्रधुनीकडे निघालें; अशासाठीं कीं, फर्नोचें जहाज तेथें असलें तर गांठ पडावी. कुकचा अजमास खरा ठरला. १८ मेला ते या सामुद्रधुनींत आले; आणि तेथें त्यांना ॲडव्हेन्चर जहाज खरोखर दिसलें. फर्नोनें सांगितलें कीं. 'दीड महिना झाला. आम्हीं येथें बसून आहों !' आणि मग, ताटतूट झाल्यापासून पुन्हां गांठ पडेपर्यंत आपण कसेकसे हेलकावे खाल्ले, याचें रसभरीत वर्णन फर्नोनें केलें. त्याच्या जहाजावरचे खलाशी अगदीं सुकून गेलेले होते. दोघेही कप्तान, चांगली हवा सापडावी

म्हणून, ओताहाटी बंदराकडे निघाले. आता ते दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण टोकाजवळ आलेले होते.

येथून उभयतः कप्तान आणखी दक्षिणेकडे निघाले. मग पुन्हां एकदां ॲडव्हेन्चरची आणि रेझोल्यूशनची ताटातूट झाली. आतां मात्र त्याची आणि आपली पुन्हां गांठ पडेल, असें कुक्‌ला वाटेना. डिसेंबरच्या १२ तारखेला, त्याला पाण्यावर बर्फ आढळूं लागलें. दोन दिवसांनीं पुढें बर्फाचे खडपेच्या खडपे लागूं लागले. यांतून, कुक्‌चें जहाज तसेंच पुढें पुढें गेलें. वारा अनुकूल होता. वेगानें पुढें गेल्यावर, अनेक लहान लहान बेटें त्यांना लागलीं. पण त्याहीपेक्षां म्हणजे बर्फाचे सुटे खडपे अधिकाधिक भेटूं लागले. त्यांना चुकवण्याची कुक्‌नें पराकाष्ठा केली. परंतु, मधून मधून ते त्याच्या जहाजाच्या बरगड्यांवर येऊन आदळत असत. एक खडपा चुकवावा, तों दुसरा लागावा, असें होऊं लागलें. सगळींकडेच धुकें भरून राहिलें. अर्थात् उत्तरेकडे वळणें भाग आहे. असें कुक्‌ला वाटूं लागलें. २१ तारखेला तर, बर्फाच्या खडप्यांचा त्यांच्याभोंवतीं एवढा गराडा पडला कीं, आपण यांतून कसें सुटतों, असें कुक्‌ला होऊन गेलें.

१७७४ च्या जानेवारीच्या शेवटी, एके दिवशीं सकाळीं दक्षिणेच्या बाजूला पांढरे स्वच्छ ढग दिसूं लागले. त्यावरून त्यांनीं अनुमान केलें कीं, पुढें बर्फाचें मैदानच सुरू होणार असावें. लवकरच ते त्याच्या अगदीं जवळ येऊन ठेपले. उजवीकडे, पश्चिमेच्या बाजूला आणि डावीकडे पूर्वेच्या बाजूला हें बर्फाचें मैदान इतकें दूरवर गेलें होतें कीं, तें कोठें संपलें असेल, याची कल्पनाही त्यांना होईना. दक्षिणेकडील निम्या क्षितिजावर प्रकाशाचे झोत पडल्यासारखें दिसूं लागले आणि त्या झोतांत, बर्फाचें डोंगर स्वच्छ दिसले. लोकांनीं हे डोंगर मोजले तेव्हां ते ९७ भरले. यांतले कांहीं पुष्कळच मोठे होते आणि एकमेकांच्या मागें वर जातां

जाता, कांहींची शिखरें ढगाला जाऊन भिडलेली दिसलीं. जवळजवळचें मैदान, बर्फाच्या खडप्याचेंच बनलेलें होतें. पण, ते खडपे येवढे मोटे आणि, थोड्या अंतरा अंतरावरच पण असे गच्च बसले होते कीं, त्यातून पुढें वाट काढणें, सर्वथा अशक्य होतें. दक्षिणेकडील समुद्रांतून खालीं खालीं जाऊन, कदाचित् एकाद्या नव्या भूमीचा शोध लावता येईल ही कॅप्टन् कुक्ची आशा या ठिकाणीं विराम पावली; त्याने आपल्या डायरींत लिहिलें कीं, ' मधून कोठून तरी आणखी दक्षिणेकडे जाता येणें अशक्य होतें असें माझ्यानें म्हणवत नाहीं. परन्तु मी तसा गेलों असतों, तर माझ्यावर भलतींच संकटें कोसळलीं असतीं आणि मी वेड्यासारखा वागलो असें ठरलें असते. माझ्या आधीं नावाडी लोकांनी जेथपर्यंत शिरकाव केला होता त्याच्या पुष्कळ पुढें जावे येवढीच माझी आकांक्षा नव्हती; तर माणसाला जेथपर्यंत जाता येणें शक्य आहे, तेथपर्यंत जाऊन पोहोंचावें असा माझा हेतू होता. परंतु, हे बर्फाचें डोंगर माझ्या आड आले आणि मला थोडेसें बरेंही वाटलें. कारण, नाहीतर मी भलत्याच एकाद्या वेडाने झपाटलों असतों; आणि दक्षिण ध्रुव शोधून काढण्याची आशा धरून कोठें तरी गोठून गेलो असतों ! आतां एक इंचभरही दक्षिणेकडे जातां येण्यासारखे नव्हतें '' आणि म्हणून त्यानें आपले सूकाणूं उत्तरेकडे वळवले. विषुववृत्ताच्या पट्ट्यांत हिवाळा घालवावा असे त्यानें ठरविलें. अति दक्षिणेकडील समुद्र आता विचारांतून सोडून देणेंच भाग होतें. पण दक्षिण अटलांटिक समुद्रात, कांहीं संशोधन करता येणें शक्य होतें आणि म्हणून तो उत्तरेकडेच वळला.

११ मार्चला ते एका नवीनच बेटावर आले आणि त्याला त्यानीं डेव्हीस लॅण्ड असें नांव दिलें. बेटावर गेल्यावर, त्याला दिसून आलें कीं, येथले लोक चोरटे आहेत; आणि वस्तूंची देवघेव करतांना फार लबाडया

करतात. त्यांच्याकडून ज्या वस्तू कुकच्या लोकांनीं विकत घेतल्या होत्या त्यासुद्धां ते खिशांतून काढून घेऊं लागले! आणि ते केव्हां काढून घेतात, हेंही त्या खलाशांना कळेनासें झालें! शेवटीं त्यांना दिसून आलें कीं, ती तीच वस्तू हे लोक आपल्याला दोनदोनदां विकत आहेत! बटाटे, केळीं, आणि ऊंस यांची पिकें या बेटावर बरींच दिसलीं. एके ठिकाणीं दगडांच्या ढासळलेल्या चौथऱ्यावर कांहीं पुतळेही त्यांना दिसले. पण हे खालीं रेललेले होते; आणि त्यांचीं नाकें तोंडें फुटलेलीं होतीं. त्यांतला एक पुतळा पंधरा फूट उंच होता आणि त्याच्या खांद्याचा भाग सहा फूट रुंद होता. कुकचे लोक या बेटावर बराच काळ हिंडत राहिले. परंतु, तेथल्या हाताळ लोकांनी त्यांना इतका उपद्रव दिला कीं, कांहीं छरे उडवल्याशिवाय आतां घडगत नाहीं, असें त्यांना दिसूं लागलें. कारण, त्यांच्या हातांतल्या पिशव्यासुद्धां ते पळवूं लागले! गोळीबार करतांच, हे चोरटे चांगले शुद्धीवर आले.

एप्रिलच्या ७ तारखेला त्यांना एक नवें बेट लागलें आणि त्याला त्यांनीं हूडग् आयलंड असें नांव दिलें. या बेटावरचे लोकही मागच्याच जातीचे आहेत, असें कुकला दिसून आलें. सगळा व्यवहार ऐन जिनसी होत होता. म्हणजे जिन्नस घ्यावा आणि जिन्नस द्यावा, असें चाललें होतें. पण यांनीं दिलेली जिन्नस ते बेटावरचे लोक ठेवून घेत; आणि बदला, त्यांच्या जवळचे मागितलेले दुसरे जिन्नस देण्याला ते काचकूच करीत! शेवटीं बंदुकीचा दस्ता दाखवूनच त्यांना शुद्धीवर आणावें लागलें! स्पॅनिश लोकांनीं हुडकून काढलेलें मेन्हाना बेट त्यांना आतां लागलें. या बेटावरील माणसें अतिशय बांधेसूद आणि फार सुस्वरूप दिसली. इतकीं चांगलीं माणसें पृथ्वीवर कोठेंही सांपडणार नाहींत, असें कुकचें मत पडलें. परन्तु, एका लंगोटीशिवाय त्यांच्यापाशीं वस्त्र नव्हतें. बायका एक कसला तरी घडपा मांड्यापर्यंत गुंडाळीत, आणि खांद्यावरून दुसरा एक घडपा टाकीत.

एप्रिलच्या २१ तारखेला ते ओताहिटी येथें आलें आणि दुसरे दिवशी माताबाई उपसागरात शिरले. पूर्वी १७६७ त या बेटावर एक राणी त्यांना भेटावयास आल्याचें वर्णन वर आलेंच आहे. तीच आतां त्यांना पुन्हां एकदां भेटावयास आली. कुकनें तिची चांगली संभावना केली. कारण, हे भले लोक पुन्हां आपल्याला भेटतील असें त्याला वाटेना.

जून ४ ला, तिसऱ्या जॉर्जचा वाढदिवस होता. त्या मुहूर्तानें कुकनें आपला मुक्काम हालविला, आणि येतां येता २० तारखेला ते एका मोठ्या बेटावर आले. तेथील लोकांना आपण मित्र आहों, असें त्यांनीं खुणांनीं जाणविलें. परंतु, रानडुकराप्रमाणें ते त्यांच्या अंगावरच धावून येऊं लागले ! कुकच्या लोकांनीं दोनचार वायबार काढले. परंतु, येवढ्यानें ते बधतील असें दिसेना. शेवटीं या बेटाला सॅव्हेज आयलंड हें नांव देऊन कुक पुढें निघाला. रॅाटरडॅम् बेटावरून पुढें जाता जातां २१ जुलैला ते व्हिटसनूटाईड बेटापाशीं आले. पुढें मॅलिकोलो बेटावरच्या एका बंदराला पोर्ट सॅंडविच् हें नांव देऊन कुक् पुढें निघाला.

ऑगस्टच्या ६ तारखेला, दूर अंतरावर त्यांना एक मोठा ज्वालामुखी दिसला. मोठा गडगडाट चालू होता आणि म्हणून, त्याच दिशेनें कुक् निघाला. रात्रींच्या वेळीं या ज्वालामुखीच्या तोंडांतून धुराचे आणि विस्तवाचे लोळच्या लोळ बाहेर पडूं लागले. ढगांचा गडगडाट व्हावा; किंवा पुष्कळसे सुरुंग एकदम उडावे, असे प्रचंड आवाज होऊं लागले आणि इतक्यांत एक पावसाची सरही आली. सारी हवा राखेनें भरून गेली. वाळू आणि दगड हीं भाजल्यानें पीठ होऊन गेलेलीं होतीं. खलाशांपैकीं एका माणसानें शेजारच्या झऱ्यांतला दगड उचलला, तों त्याचीं बोटें भाजून निघालीं ! १० आणि ११ तारखेस मोठमोठाले स्फोट होत होते. दर तीनचार मिनिटें झालीं कीं, एक स्फोट व्हावा असें चाललें होतें.

भुईला मोठमोठाले तडे गेलेले दिसले; आणि त्यांतून गंधकाच्या वाफा बाहेर पडत होत्या. पण इतकें असूनही थोड्याशा अंतरावर, अंजिराचीं झाडें लागलेलीं दिसलीं; आणि जवळच्याच टेकडीवर नारळांच्या झाडांचीं वनेंही उभीं होती ! तिकडील लोकांना लोखंड या धातूची कल्पनाही नव्हती आणि वस्त्र दिलें तरी त्याचा उपयोग काय करावा, हें त्यांना कळत नाहींसें दिसलें !

ऑक्टोबर १० ला त्यांना एक मोठें बेट लागलें. त्याला त्यांनीं नॉर्फोक आयलंड असें नांव दिलें. या बेटावरचीं झाडें झुडपें न्यूझीलंडवरील जातीचींच असलेलीं पाहून त्याला मोठें नवल वाटलें. शेवटीं येतां येता, ते खरोखरच पुन्हां एकदां न्यूझीलंडमध्यें आले.

नोव्हेंबर १० ला कुकनें न्यूझीलंड बेट सोडलें, आणि जो सागराचा भाग अजून त्यानें संशोधला नव्हता, त्याकडे जाण्याचें त्याने ठरविलें. लवकरच ते टेराडेल फ्यूगो या बेटावर येऊन पोहोंचले. हें बेट दक्षिण अमेरिकेच्या अगदीं दक्षिण टोकाजवळ आहे. येथें पोंचल्यावर आपण दक्षिण पॅसिफिकमधून पूर्णपणें बाहेर पडलों, असें त्यांना वाटूं लागलें. यावेळीं कॅप्टन् कुक् हा थोड्याशा अभिमानानें म्हणाला कीं, ‘ आतां या दक्षिण पॅसिफिक महासागरांत शोधून काढावयाचें कांहीं राहिलें आहे, असें मला वाटत नाहीं; किंवा, आम्ही जें काय करून दाखवलें आहे, त्याहून जास्त कोणाला कांहीं करतां आलें असतें असेंही वाटत नाहीं. ” डिसेंबर २८ ला केप फॉर्मला वळसा घालून, रेझोल्यूशन जहाज दक्षिण अटलांटिकमध्यें शिरलें. जानेवारी १ ला त्यांनीं एका नव्याच बंदराला न्यू इअर्स हार्बर हें नांव दिलें. केप साऊंडर्स् , कंबरलंड बे, आइल ऑफ जॉर्जिया, अशीं नांवें निरनिराळ्यां वाटेंत भेटणाऱ्या बेटांना देत देत ते उत्तरेच्या रोखानें चाललेले होते. आतां, सर्व दक्षिण महासागर संशोधून झाला होता; आणि

विषुववृत्ताचा पट्टाही त्यांनीं पुरा पाहिलेला होता; आणि म्हणून हातीं घेतलेलें काम खरोखरच संपलें आहे, असें कुकला वाटूं लागलें. शिवाय, जहाजावरचीं अवजारें व दोरखंडें हींही इतकीं जीर्ण झालीं होतीं कीं, तुरपण्याचें आणि गांठी मारण्याचें काम दिवसें दिवस वाढत चाललें होतें, जवळची शिधासामुग्री संपत आली होती आणि जी उरली होती ती निःस्वत्व झाली होती. खलाशी लोक हे हाडाचे इंग्रज, आणि समुद्राच्या वाऱ्याला निढावलेले म्हणूनच इतके दिवस टिकून राहिले; पण त्यांनाही आतां वाटूं लागलें कीं, दाताचे रोग बळावत जातील. अशा स्थितींत संशोधनाच्या कामांत त्यांना आणखी राबत ठेवणें प्रशस्त नाही, असें कुकला वाटूं लागलें. या सुदीर्घ काळांत त्यांची वर्तणूक इंग्लंडच्या कीर्तीला शोभेशीच राहिलेली होती आणि कुकसारखे अधिकारी लोक फार उदार आणि समंजस असल्यानें, आपणही त्यांच्याशी त्याच थाटानें वागलें पाहिजे असें हे खलाशी समजत असत.

मार्च २२ ला ते केप ऑफ गुड होपला येऊन पोहोंचले आणि तेथें कॅप्टन् कुकला वर्दी लागली कीं, परतीच्या वाटेवर फर्नोचें ॲडव्हेंचर जहाज येथें येऊन लागलें होतें. फर्नोने येथील अधिकाऱ्यापाशीं कुकसाठीं एक पत्र लिहून ठेवलें होतें. यावरून फर्नोची काय दशा झाली असावी याची कल्पना कुकला चटकन् आली. इंग्लंडांत पोंचल्यावर फर्नोनें कुकला सगळी कच्ची हकीकत सांगितली.

केप ऑफ गुड होप यांनी लवकरच सोडलें. कारण, सर्वानुमतें असें ठरलें कीं, आतां इकडे तिकडे कोठें न फिरकतां सरळ घरींच जावें. सेंट हेलेना बेट, ॲसन्शन बेट येथें थोडा थोडा मुक्काम करीत १३ जुलैला ते अझोर्स बेटामध्यें आले; आणि २९ जुलैला इंग्लंडच्या प्लिमाऊथ बंदरांत

कुकच्या जहाजानें शेवटीं नांगर टाकला. ३ वर्षे आणि १८ दिवस इतक्या प्रदीर्घ काळपर्यंत समुद्र–संशोधनाचें हें काम चाललें होतें. येवढ्या काळांत त्यांच्यापैकीं फक्त चारच माणसें दगावलीं, आणि आजारीपणानें यांतला फक्त एकच मेला. कॅप्टन् कुक म्हणाला, 'परमेश्वराच्या दयेमुळें हें सर्व झालें.'

कुकनें या आपल्या दुसऱ्या सफरीचा वृत्तांत संपवितांना उद्गार काढले आहेत कीं, 'आमच्या सफरीचे मुख्य हेतू कितीसे सफल झाले आहेत हें मींच सांगत बसणें बरोबर दिसणार नाहीं. आम्ही जर एकादी नवी खंड-तुल्य भूमि शोधून काढली असती, तर जिज्ञासू लोकांना मोठें समाधान झालें असतें, हें खरें. परंतु, आम्हांला अशी भूमि लागलीच नाहीं—आणि आम्हीं शिकस्त केली असतांना सुद्धां ती आम्हांला लागली नाहीं. यावरून येवढें मात्र सिद्ध होतें कीं, अशी भूमि असल्याचा जो समज आहे तो बरोबर नाही. तथापि, लोकमत या बाबीसंबंधानें काय होईल, ही गोष्ट जरी क्षणभर सोडून दिली, तरी दुसऱ्या एका बाबीसंबंधानें मात्र आम्हांला पूर्ण समाधान वाटतें. आम्हीं अनेक बेटें शोधून काढलीं; पण तितक्याच महत्त्वाचा दुसरा एक शोध आम्हीं लावला. तो हा कीं, जहाजावर बसून कितीही काळपर्यंत आपण समुद्रावर भटकावें, निरनिराळी हवामानें भेटावीं, निरनिराळ्या संकटांनीं आपल्याला गांठावें आणि प्रसंगविशेषीं आपण अगदीं थकून जावें, तरी सुद्धां, आपणां दर्यावर्दी लोकांची प्रकृति खास टिकून राहते; आणि हा शोध कोणाही उदार मनाच्या माणसाला महत्त्वाचा वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. दक्षिणेकडील महासागरांतील एकादें विशाल खण्ड, आम्हांला कां सांपडूं नये, या संबंधीचा वाद जेव्हां माणसें विसरून जातील, तेव्हांही मीं आतांच सांगितलेला हा प्रकृती-संबंधीचा शोध सर्वांच्या ध्यानीं राहील अशी उमेद आहे.'

या दुसऱ्या सफरींत त्यानें केलेल्या कामाची बेरीज अशी होतेः— दक्षिण महासागरांत एक फार मोठें खंड आहे ही कल्पना त्यानें निरस्त केली.







निदान जहाजानें तरी तेथें पोहोंचतां येत नाहीं येवढें तरी त्यानें निश्चित दाखवून दिलें. या प्रयत्नांत असतांना न्यू कॅलेडोनिया नांवाचें एक स्वतंत्र बेट त्यानें शोधून काढलें. हें बेट आकारानें लहान असलें तरी, तिकडल्या महासागरांत न्यूझलिंडच्या खालोखाल तेंच मोठें आहे. ऑस्ट्रेलियाच्या पूर्व किनाऱ्याच्या मध्यापासून पूर्वेकडे कांही अंतर गेल्यावर हें बेट लागतें. त्यानें जॉर्जिया नावाचेंही आणखी एक बेट शोधून काढलें. आणि सॅन्डविच् भूमिही त्यानेंच दाखवून दिली. ही भूमि दक्षिण पॅसिफिकच्या उंबरठ्यावर आहे. विषुववृत्तावरील समुद्रपट्टा त्यानें दोन वेळां पाहिला आणि आधीच्या लोकांनीं लावलेल्या शोधांचीं स्थळें त्यानें यावेळीं निश्चित केलीं; आणि किती तरी नवीन स्थळें शोधून काढलीं. येवढें मात्र सांगितलें पाहिजे कीं, सत्तर वर्षांनीं पुढें सर जेम्स क्लार्क रॉस् या दर्यावर्दीनें असें दाखवून दिलें कीं, कुक् गेला होता, त्याच्याहीपेक्षां खालीं जातां येतें; तिकडे एक मोठें थोरलें द्वीप आहे, आणि जहाजांतूनच तेथें पोहोंचतां येणें शक्य आहे;

आणि आतां तर प्रत्यक्ष दक्षिण ध्रुवावरच माणसें पोंचलीं असून, अनेक मोठमोठाल्या प्रदेशांचा शोध लागून चुकला आहे.

कॅप्टन् कुक् यानें केलेली तिसरी सफर ही अद्‌भुत गोष्टींनीं भरलेली आहे; आणि या सफरींतच शेवटीं त्याचा अंत झाला. कित्येक शतकेंपर्यंत, युरोपांतील पंडितांची अशी एक कल्पना होती की, उत्तर ध्रुवाच्या बाजूला कोठें तरी, अटलांटिक महासागर आणि पॅसिफिक् महासागर हे एकमेकांस मिळालेले असावे. स्कॉटलंडमधून उत्तरेकडे बाहेर पडून, नॉर्वेच्या उत्तर टोकाला वळसा घालून, युरोपियन रशिया व सैबेरिया यांच्या किनाऱ्यानें जर पुढें पुढे गेलें, तर पॅसिफिक् महासागर पुढें कोठें तरी भेटलाच पाहिजे, किंवा इंग्लंडमधून बाहेर पडून, वायव्येच्या रोखानें पुढें जातां जातां, कॅनडाच्या उत्तरेस जीं अनेक लहान मोठीं बेटें आहेत, त्यांतून पश्चिमेकडे मार्ग काढतां काढतां अलास्का द्वीपकल्पाच्या उत्तरेस पोहोंचता येईल; आणि तेथे कोठेंतरी, पॅसिफिक महासागरात उतरावयास वाट सांपडेल. या दोन्हीं महासागरांची भेट विषुववृत्ताच्या दक्षिणेला पुष्कळच पर्यटन करावे तेव्हांच होतें हें आतांपर्यंत अनेकदां सिद्ध झालें होतें. पण हा प्रवास फार लांबीचा आहे हेंही सिद्ध झालें होतें. याच्याऐवजीं वर सांगितलेलीं उत्तरेकडील शीत कटिबंधांतील वाट जर शोधून पाहिली, तर हे दोन महासागर कोठें तरी भेटलेले आंढळतील आणि या कामीं, समुद्र-पर्यटन थोडें करावें लागेल, असा लोकांचा अंदाज होता. हा अंदाज बरोबर होता. परंतु, या वाटेनें जाण्याचा प्रयत्न करण्याचें धाडस कोणी करावयाचें हा काय तो खरा अवघड प्रश्न होता.

दोन अवाढव्य सफरी करून कुक् परत आल्यानंतर, संशोधनाचें क्षेत्र आतां उत्तरेकडेच फक्त शिल्लक राहिलें होतें, आणि म्हणून ब्रिटिश सरकारनें इकडल्या सफरीची योजना हातीं घेतली. नवी सफर म्हटली कीं, कुक्‌चें

नांव सगळ्यांच्या तोंडी चटकन् यावें, हें स्वाभाविक होतें; पण जाणते लोक म्हणाले कीं, या गृहस्थाचा आपण असा अंत पाहूं नये. त्यानें इतकीं वर्षें समुद्रांत घालविलीं आहेत, इतकीं संकटें सोसली आहेत, आणि इतके नवे नवे शोध लावले आहेत कीं, आतां त्यालाच पुन्हां 'उत्तरेकडे जा' म्हणणें अन्यायाचें होईल. परंतु, हा विचार कितीही जरी बरोबर असला, तरी येवढी मोठी सफर हातीं घ्यावयाची, तर त्याची सल्लामसलत घेणें तरी अवश्यच होतें. आरमार खात्याच्या प्रमुखाच्या घरी या कामासाठी तज्ञांची सभा भरली; आणि या विषयाची शहानिशा होऊं लागली. बोलण्याच्या ओघांत कुक् फार आवेशानें आपलें मत सांगूं लागला; आणि ही सफर यशस्वी झाली तर कोणचे फायदे होतील, हेंही त्यानें अतिशय सुरसपणानें सांगितलें. शेवटीं, तो आपण होऊनच म्हणाला कीं, 'ही सफर जर येवढी वैभवाची होणार आहे तर ती करून येण्याचें काम मी स्वतःच हातीं घेईन.' श्रोत्यांना जें हवें होतें, तेंच त्याच्या तोंडांतून आलें! आणि मग ही माळ त्याच्याच गळ्यांत पडली!!

हें काम केवळ संशोधनाची हौस आणि हिंमत ज्याचें अंगीं आहे, तोच करील, हें जरी आरमारखात्याला खरें वाटत असलें, तरी आतां सरकारनें येवढ्यावरच हे काम भागवावें हें त्याला बरोबर वाटेना. मागें १७४५ त हडसन्‌बे मधून जो कोणी वाट शोधून काढील, त्याला २०००० पौंडाचें बक्षीस देण्यांत येईल असा ठराव पार्लमेन्टनें केला होता. त्याचें रूपांतर असें करण्यांत आलें कीं, जर एकाद्यानें अटलांटिक आणि पॅसिफिक महासागर यांच्यामधील जलमार्गानें प्रवास केला, आणि तो २२° डिग्रीच्या उत्तरेकडे असला, तर त्याला हें २०००० पौंडाचें बक्षीस मिळेल; म्हणजे नवी भूमि शोधून काढण्याची स्वयंभू ईर्षा जर कोणाच्या मनांत असेल, तर तिला आतां थोडें विलोभनही प्राप्त झालें.

'रेझोल्यूशन' आणि 'डिस्कव्हरी' हीं दोन जहाजें सुसज्ज करण्यांत आलीं. पहिलें जहाज कॅप्टन् कुक याच्या हातीं दिलें; आणि दुसरें कॅप्टन् क्लार्क याच्या हातीं देण्यांत आलें. जहाजांची बाकीची तयारी आणि खलाशांची तयारी ही होतां होतां कांहीं महिने गेले. पूर्वीपेक्षां आतां या जहाजांची उपयुक्तता वाढविण्याचा मोठीच दक्षता आरमारी खात्यानें ठेवली. पॅसिफिक् महासागरांत आतांपर्यंत, कुक यानें जे मित्र जोडले होते, त्यांना नजर म्हणून, युरोपांतील अनेक प्रकारचे पशू, पक्षी आणि तिकडच्या बागांत लावण्यासाठीं इकडील नाना प्रकारचें बीं बियाणें कुकनें बरोबर घेतलें. ब्रिटिश चॅनल मधून बाहेर पडावयास, १७७६ च्या जुलैची १४ तारीख उगवली. वाटेंत कॅनरी बेटांत थोडासा मुक्काम करून ऑक्टोबरच्या १८ तारखेस कॅप्टन कुक हा केप ऑफ गुड् होप येथें आला. प्लिमाऊथ येथें कांहीं गुंता निघाल्यामुळें डिस्कव्हरी जहाज थोडें मागाहून आलें. आपली ही सफर अनेक दृष्टींनीं सफल व्हावी, असें कुकला वाटत असल्यामुळें, प्रत्येक मुक्कामाच्या जागीं तेथील लोकांच्या ओळखी करून घ्याव्या; तेथील पशुपक्ष्यांची पाहाणी करावी, जरूर तर, आपल्या जवळचे पशुपक्षी आणि बीबियाणें तेथील लोकांना द्यावें, असा उपक्रम त्यानें सुरू केला. केपटाऊन येथें मुक्काम असतांना, तेथें त्यानें दोन खोंड, दोन कालवडी, शिंगरांच्या दोन नरमाद्या, दोन एडके, दोन मेंढ्या, असे अनेक पशू विकत घेतले. त्याच्या मनांत हे सारे न्यूझीलंडमधील ओतहिटि येथील आपल्या मित्रांना द्यावयाचे होते.

न्यूझीलंडला पोहोंचेपर्यंत विशेष कांहीं घडून आलें नाहीं. परंतु क्वीन चारलोटी सामुद्रधुनींत त्यांचीं जहाजें येऊन लागल्याबरोबर, पूर्वी दोन वेळां तो तेथें येऊन गेलेला असल्यामुळें, ओळखीचे झालेले आणि मित्र बनलेले अनेक लोक आपापल्या होडग्यांत बसून त्याच्याकडे आले. मागें

एकदां फर्नो याच्या दुर्दैवी सफरीची थोडीशी हकीकत आलीच आहे. त्या



फर्नोच्या लोकांना या लोकांनीं मारलें होतें. तेव्हां त्यांना वाटलें कीं, त्याचा सूड उगवण्यासाठींच कुक् हा पुन्हां आला असावा. परंतु, कुकचा तो हेतूच नाहीं, हें त्यांना लवकरच दिसून आलें. या देशांतील लोकांत बरेच तट दिसून आले. निरनिराळ्या अनेक जमाती तेथें असून, त्या एक-मेकांना अगदीं पाण्यांत पाहतात, आणि कोणी कांहीं आपली आगळीक केली, तर त्याचा सूड उगवल्याखेरीज त्यांना चैन पडत नाहीं; या अविश्वासाच्या भावामुळें जो तो नेहमी सावध असल्यासारखा दिसतो; या देशांतील लोक अनेक बायका करतात; आणि मुलींचीं लग्नें फार लहानपणीं होतात; आणि ज्या मुलीचें लग्न होत नाही, तिला सगळें जग ओस आहे असें वाटूं लागतें; लहान मोठीं निरनिराळ्या तऱ्हेचीं शस्त्रें वापरण्यांत हे

लोक मोठे पटाईत आहेत, असें कुकला दिसून आलें. एकदां ते चिथरले आणि एकमेकांच्या अंगावर धावून जाऊं लागले, म्हणजे ते डोळे गरागर फिरवूं लागतात, त्यांच्या जिभा बाहेर लळलळूं लागतात. आणि तोंडें वेडी-विद्रीं दिसूं लागतात. या देशांत नरमांस—भक्षणाची चाल आहेच आहे असें या ख्रिस्ती लोकांना दिसून आलें.

फेब्रुआरी २५ ला त्यांनीं आपला मुक्काम न्यूझीलंडमधून हालविला, आणि ते ओताहिटीकडे निघाले. परंतु इतक्यांत पूर्वेचा वारा सुटला आणि तो इतके दिवस वहात राहिला कीं, उत्तरेकडील सफरीचा हंगाम आपल्या हातून चालला असें कुकला वाटूं लागलें. जहाजावरचें पिण्याचें पाणी संपत आलें. आणि गुरांचा चाराही फार थोडा उरला. म्हणून, फ्रेंडली आयलंडस् या बेटांकडे ते निघाले, आणि ओताहिटी बेटावर यावयास त्यांना ऑगस्ट महिना उगवला. कांहीं महिन्यापूर्वी स्पेन देशाचेंही जहाज येथें येऊन लागलें होतें, आणि तें निघून गेलें तरी येथें कांहीं स्पॅनिअर्डस् या बेटावर दहा महिने राहिलेले होते. त्यांनीं सुद्धां आपल्याबरोबर, बकरीं, डुकरें, कुत्रें, खोंड, कालवडी, हीं आणलेलींच होतीं. बेटावरील लोकांना हा सारा प्रकार नवीनच होता. कुकनेंही आपल्याबरोबर असे कितीतरी पशु आणले होते. ते त्यानें आपल्या रानटी मित्रांना वाटून टाकले.

डिसेंबर ९ ला सोसायटी आयलंडस् सोडून, कुक उत्तरेच्या रोखानें निघाला. २२ अंशावर गेल्यावर, त्याला लहान लहान अनेक बेटें लागलीं. तेथें थोडाथोडा मुक्काम करीत, तो उत्तर अमेरिकेच्या किनाऱ्याकडे चालूं लागला. मार्च महिन्याच्या ७ तारखेस हा किनारा त्यानें प्रत्यक्ष गांठला ४९।। अंशावर असतांना या किनाऱ्यावर त्याला एक बंदर लागलें. आतां पर्यंत, अनेक वादळें डोक्यावरून गेल्यामुळें त्याचें जहाज अगदीं खराब होऊन गेलें होतें. या बंदरांत शिरल्यावर, त्यानें जहाजाची दुरुस्ती केली.

आणि सरपणाचा आणि गोड्या पाण्याचा पुरवठा जहाजावर करून घेतला. मे महिन्यांत तो अशाच एका बेटाला लागला. सर्पण, चारा, पाणी घेण्यासाठीं त्याला ठिकठिकाणीं मुक्काम करावे लागत, आणि मुक्काम केल्यानंतर, त्या त्या ठिकाणच्या लोकाशीं मैत्री करणें आणि त्यांच्या चाली रीती पाहणें हीं कामेंही तो करीत असे. या बेटांतील एका माणसाच्या घरांत तो गेला, तों तेथें एक बाई आपल्या पोराची हजामत करीत बसली आहे, असें त्याला दिसलें ! एका काटकीच्या टोकाला शार्क माशाचा दांत घट्ट बसवलेला होता; आणि या दांतानें केंस काढण्याचें काम चाललें होतें, आणि केस मऊ पडावें म्हणून, पाण्यांत बुचकळलेली एक चिंधी त्या पोराच्या डोक्यावर ती मधून मधून ठेवीत असे. वस्तऱ्यानें केस निघावे, तसेच या दातानेंही निघत होते; आणि पोर हूं कां चूं करीत नव्हतें ! मग कॅप्टन कुकनें हा नव्याच तऱ्हेचा वस्तरा आपल्यावरच लावून पाहिला, आणि तो फार चांगला चालतो, असें त्याला दिसून आलें. दाढी करण्याचीही अशीच एक युक्ती तेथल्या लोकांनीं काढलेली दिसली. एक शिंपला दाढीच्या केसांत खालीं धरावयाचा; आणि दुसऱ्या शिंपल्याच्या कंगोऱ्यानें दाढीवरून खालीं खरडावयाचें. दाढी फार हळूहळू होई; पण केस मात्र चांगले निघत. शेवटीं, कुकच्या जहाजावरील खलाशी असल्या हजामती साठीं बेटावर जाऊं लागले; आणि जहाजावरील न्हाव्याच्या वस्तऱ्याची मजा पाहण्यासाठीं ते रानटी लोक जहाजावर येऊं लागले !

जून महिन्यांच्या ३० तारखेस आणखी एका बेटावर ते आले. तेथल्या राजाच्या भावाचें नांव फुताफाई असें होतें. येथें सेवेचीं एक चमत्कारिकच तऱ्हा त्यांना दिसून आली. फुताफाई अंथरुणावर पडला, तेव्हां शेजारीं बसलेल्या दोन बाया त्याच्या पाठींत बुक्क्या मारूं लागल्या. बुक्या खातां खातां फुताफाईला शेवटीं झोंप लागली. बायका तशाच बसून

होत्या. फुताफाई पुन्हा जागा होतोसा दिसला कीं, त्या पुन्हा बुक्क्या मारूं लागत. अशा प्रकारें राजबंधूंची सगळी रात्र मोठ्या सुखानें गेली !

या बेटावर कुक जास्त दिवस राहिला याचें कारण असें की, लवकरच तेथें ग्रहण दिसणार होतें. परन्तु, ग्रहण पहावयास लागणारीं उपकरणें इतकीं नादुरुस्त झालीं होतीं कीं, तो सोहळा त्यांना साधला नाहीं. परन्तु, या बेटाची शोभा केवळ अवर्णनीय होती. सृष्टीची वनें आणि माणसांनीं बनवलेलीं उपवनें हर तऱ्हेच्या सौंदर्यांनीं सुशोभित झालीं होतीं. केळीचीं वनें, भाकरीच्या झाडाच्या राया आणि उसाचे मळे हे जिकडे पहावे तिकडे दिसत असत. परन्तु, यांना पुढें जावयाचें होतें; या फेंडली आयलंडज्-मध्यें ते सुमारे तीन महिने राहिलेले होते आणि यांच्या निरनिराळ्या बेटांतील लोकांची मैत्री त्यांनीं संपादन केली होती. लोक मध्यम उंचीचे खरे. परन्तु, अंगानें चांगले मजबूत आणि बांधेसूद दिसले. आश्चर्याची गोष्ट ही की, कांहीं कांही लोकांचे तोंडावळे थेट युरोपियन लोकांसारखे दिसले. कांही माणसें तर फारच सुस्वरूप दिसली. आणि कांहींचीं नाकें तर 'रोमन नासिका' या वर्णनालाच पात्र दिसली. विशेषतः स्त्रियांचा बांधा फारच डौलदार असून, त्यांच्या तोंडावरची छायाही मोठी रम्य दिसत असे. त्यांचे हात मात्र फारच बारीक होते; आणि हाताचीं बोटें तशीच फार नाजूक होतीं. या लोकांना मरणाचें फारच भय वाटतें; आणि मृता-विषयीं त्यांना विलक्षण आदर वाटतो. दुःख प्रदर्शित करण्याची त्यांची पद्धति फारच भयंकर आहे. ते आपल्या दातांवर दगड मारून घेतात व माशाच्या दातानें डोक्याचीं रक्तें काढतात. यांची भाषा न्यूझीलंडमधील लोकांच्या भाषेसारखीच आहे.

हें बेट सोडून थोडें पुढें गेल्यावर, त्यांना ओताहिटी बेट दिसूं लागलें. कॅप्टन् कुक याला या बेटाची ओळख आधींच आलेली होती. पहिल्या

दोनही सफरींच्या वेळी तो येथें आलेला होता. अर्थात् त्याचे जुने मित्र त्याला येथें भेटले आणि त्यानें व जहाजावरच्या इतर लोकांनीं या बेटावर बरेच दिवस मौजेनें काढले. कॅप्टन् कुक् स्वतः या बेटावर अगदी लुब्ध होऊन गेला होता. "या बेटाच्या आग्नेय टापूइतका सुंदर प्रदेश साऱ्या दुनियेत कोठें सांपडणार नाहीं. येथल्या डोंगराचे तुटलेले कडे उंच उंच आहेत. आणि अगदीं वरच्या कंगोऱ्यापर्यंत, त्यांच्यावर खूप झाडझाडोरा वाढलेला आहे. पुढें पसरलेलें मैदान आणि शेजारच्या दऱ्या याही वनस्पतींनीं भरून गेलेल्या आहेत. या वनस्पतींची उन्मत्त वाढ पाहून मन थक्क होऊन जातें. प्रत्येक दरीतून एक एक नदी वहात गेलेली आहे आणि खोऱ्यांतील सपाटीवर लोकांनी आपलीं घरें मन मानेल तशीं बांधलीं आहेत. जमीन इतकी सुपीक आहे कीं, लोकाना शेतकीचे कष्ट कांहींच पडत नाहींत. भाकरीचीं झाडें जिकडे तिकडे आपोआपच उगवतात. केळी आणि नारळी मात्र त्यांना लावाव्या लागतात. लोक मागील बेटांतल्या प्रमाणें बळकट दिसत नाहीत. कष्ट कसलेच पडत नसल्यामुळें ते बरेच आळशी बनलेले असतात आणि त्यांच्या शरीराचें वळण नाजूकपणाकडे ढळलेलें असतें. येथील पुरुष आपल्या बायकाना पशू समजूनच वागवतात, हें पाहून मात्र नवल वाटतें."

१७७७ च्या डिसेंबर ८ ला, कॅप्टन् कुक् हा विषुववृत्त ओलांडून, उत्तरेकडील महासागरांत शिरला. इंग्लंडमधून तो निघाला, त्याला आतां सतरा महिने होऊन गेले होते आणि ज्या कामासाठीं ते निघाले होते, तें काम अजून सुरूंच व्हावयाचें होतें. अर्थात् या उत्तरेकडील महासागरांत शिरावयाचें तर जहाजावर सर्व तऱ्हेची सिद्धता आहेना, याची पाहणी कुक्‌ला करावी लागली. ३० तारखेला ते एका बेटाला लागले आणि तेथें त्यांनीं सूर्य-ग्रहणाचा देखावा पाहिला. या बेटावर त्यांनीं ख्रिसमस घाल-

विलेला असल्यामुळें त्यांनीं त्याला ख्रिसमस आयलंड असें नांव दिलें. या बेटावरील माणसें पाहून कुक्‌ला मोठाच चमत्कार वाटला. कुक्‌चें जहाज आणि त्यावरील सामानसुमान आणि माणसें यांकडे पाहून हीं माणसें भांबवल्यासारखीच झालीं. या सामानापैकीं एकही वस्तू त्यांना ओळखीची वाटली नाहीं आणि या माणसांच्यासारखीं माणसें त्यांनीं पूर्वी कधी पाहिलीही नव्हतीं. फक्त लोखंड ही वस्तू त्यांच्या ओळखीची आहे, असें वाटलें.

फेब्रूवारीच्या २ तारखेला ते उत्तरेच्या रोखानें चालले होते; तेव्हां त्याना अनेक लहान मोठीं बेटें लागलीं; जगाच्या भूगोलज्ञानांत कुक् यानें या प्रसंगीं मोठीच भर घातली असें म्हटलें पाहिजे. लहान लहान बेटांचे थवे त्यांना भेटत किंवा एकाद्या वेळी एकादें मोठें बेट भेटे. मार्च महिन्याच्या ७ तारखेस, ज्या न्यू अल्बियन देशाचा किनारा गाठावा, असें त्याच्या मनांत होतें, तो आतां दिसूं लागला. उत्तर अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील एका टापूला, सर फ्रॅन्सिस ड्रेक यानें न्यू अल्बियन असें नांव दिलें होतें. वादळांत हेलकावे खातां खातां मार्च २९ तारखेला, ते या किनाऱ्याच्या जवळ येऊन लागले.

त्यांना पाहतांच, किनाऱ्यावरचे कांहीं लोक आपल्या होडग्यांत बसून त्यांच्याकडे आले; आणि नानाप्रकारचे हातवारे करून आणि गाणीं गाऊन, त्यांनीं असें दाखविलें कीं, आम्हीं तुमचे मित्रच आहों. कुकच्या लोकांनीं त्यांना खुणावलें कीं तुम्हीं बोटींवर यावें. परंतु त्यांना विश्वास वाटेना. हळूहळू वस्तूंची देवघेव सुरुं झाली; आणि लोखंडाच्या खिळ्यांना तर हे लोक भारीच भाळून गेले. मग एका मागून दुसरें अशीं अनेक होडगीं तेथें आलीं, आणि त्यांतून आलेल्या लोकांनीं बरोबर आणलेलीं अस्वल, लांडगा खोंकड इत्यादि पशूंचीं कातडीं, बोटीवरील लोकांकडे विक्रीसाठीं धाडलीं.

हे लोक कांहीं वल्कल–वस्त्रेंही तयार करीत असत; आणि तागाचीं वस्त्रें करणेंही त्याना माहित झालेलें दिसले. पण या सर्व मालाबरोबर, त्यांनीं माणसाच्या डोक्याच्या कवट्या आणि हात हे सुद्धा विकाऊ सामानांतच आणले होते ! या हातावरचें मास पुरतें निघालेलें नव्हतें; यावरून कुक्च्या लोकांनीं अंदाज केला कीं हे लोक नरमांसभक्षक असावे. आणि हा त्याचा अंदाज अगदीं खरा ठरला. शत्रूला मारल्यानंतर, त्यांचीं प्रेतें वाया घालवावीं, ही गोष्ट या रानटाना पसंत नसे. कुक्च्या लोकांशीं ते फार मोकळेपणानें वागले. परंतु, मागें एका बेटावर, कुकला अनुभव आला होता, तोच येथेंही आला. हेही लोक मोठे हाताळ होते. बोटीवर येण्याची परवानगी देतांच, ते भराभर वर चढले; आणि खलाशाचा डोळा चुकवून, जें हाताला लागेल तें त्यांनीं लपवावयास आरंभ केला. त्यांच्या पाशी चांगलीं धारेचीं कांहीं काहीं हत्यारें असत. या हत्यारानीं दोराला लावलेल्या लोखंडाच्या मुद्या ते कापून घेऊं लागले. वस्तू लांबविल्या-बरोबर जर या चोरट्यांना पकडलें तरच ती परत मिळण्याचा संभव आहे असें दिसून आलें, कारण थोडासा वेळ गेला कीं ते अेकमेकावर आळ घेऊं लागत आणि शेवटीं वस्तू कायमची नाहीशी होत असे. त्यांची व यांची बरी जानपछान झाली पण अेप्रिलच्या ४ तारखेला अेक मोठेंच प्रकरण निघालें. पाणी भरून आणण्यासाठीं आणि लांकडें तोडून आण-ण्यासाठीं यांचे कांहीं लोक किनाऱ्यावर गेले होते. त्यांनीं वर्तमान आणलें कीं हे सारे रानटी लोक दगड व काठ्या जमा करीत आहेत. परंतु कांहीं वेळानें दिसून आलें कीं त्यांची अेकमेकांत मारामारी सुरु होणार आहे आणि त्यांसाठीं ही तयारी होती. २६ तारखेला हवामान थोडें बदललें होतें तरी, कुक्नें पुन्हां जहाजें हांकारलीं आणि वाटेंत लागलेल्या अेका खाडीला किंग जॉर्ज साउंड असें नांव दिलें.

मे महिन्याच्या ९ तारखेला ते पुढल्या अेका बेटावर आले आणि तेथील पर्वताला माअुंट फेअरवेदर असें नाव त्यांनीं दिलें. १० तारखेस अमेरिकेच्या मुख्य किनाऱ्याच्या अगदीं जवळ ते येअून ठेपले. अेका झाडाच्या बुंध्यापाशीं अेक लहानसे टेकाड होतें. या टेकाडांत त्यांनीं अेक बाटली पुरून ठेविली. या बाटलींत १७७२ सन असलेलीं इंग्लंडांतील दोन नाणीं घालून ठेविलेलीं होती. २१ मे पर्यंत कुकचें जहाज केप अेलिझाबेथ पर्यंत येअून पोहोचलें. या ठिकाणीं त्याची अशी कल्पना झाली कीं अमेरिकाखंडाचें पश्चिम टोक आपण गांठलें आहे. परंतु लवकरच त्याची चूक त्यांच्या ध्यानांत आली. अुत्तर अमेरिकेचें टोंक आणखी पुष्कळच पश्चिमेकडे गेलें आहे. येथून हडसन बे कडे जाणारा मार्ग शोधून काढणे फार कठीण होतें. १९ तारखेला डिस्कव्हरी जहाजाची आणि यांची पुन्हां भेट झाली. तेव्हां कॅप्टन क्लार्क यानें कुकला कळविलें कीं, 'जवळच्या भूमीवर काहीं रशियन-लोक केव्हां तरी येअून गेले असावे असा अंदाज आहे.' तेथील रानटी लोकांनीं अेक लहानशी पेटी त्याच्या हवाली केली होती. ती अुघडून पाहतां रशियन भाषेत काहींतरी लिहून ठेवलेला असा कागद सांपडला. आणि त्यावर १७६६ असा सन दिला होता. या रशियन लेखात काय म्हटले आहे याची कल्पना अर्थातच त्यांना आली नाहीं. जुलैच्या २१ तारखेला कुक् याला आपला प्रवास थांबवावाच लागला. पुढें जातां जातां, आपण अजून अलास्काच्या आसपास आहों असे वाटत असतां, कदाचित् आपण आशिया खंडाच्या पूर्व टोकाला लागलों असलों पाहिजे असें कुकला वाटूं लागलें. ऑगस्टच्या २९ तारखेला आशिया खंडाचा किनारा त्यांना स्वच्छ दिसूं लागला. पण अमेरिकेचें पश्चिम टोंक आणि आशियाचें पूर्व टोंक याच्या अेकंदर स्वरूपांत त्यांना कसलाहि फरक दिसला नाहीं.

हळूं हळूं कुक्‌ला वाटूं लागलें कीं, हवामान बदललें आहे आणि इकडल्या टापूत जलप्रवास करणें आतां सोपें जाणार नाहीं. अजून या दोन टोकांच्या मधून उत्तरेकडे जावयाचें काम शिल्लकच राहिलेलें होतें. त्याचा मूळचा हेतु असा होता कीं, आर्क्टिक समुद्रांत प्रवेश करून युरोप, आशिया आणि अमेरिका यांचा संबंध उत्तरेकडून जमवावा. परंतु हवामान पालटल्यामुळें अजूनहि उत्तरेकडे जाण्याचा आपला बेत रहित करून कुक् हा त्वरेनें दक्षिणेकडे वळला आणि सँडविच् बेटांच्या रोखानें निघाला. ऑक्टोबरच्या २ तारखेस उनालास्का या बेटावर ते आले आणि लवकरच त्यांनीं जहाजांच्या दुरुस्तीला सुरवात केली. या बेटावर एक तऱ्हेचीं बोरें सांपडतात. हीं खाल्लीं म्हणजे स्कर्वी नावाचा दांताचा रोग नाहींसा होतो. म्हणून माणसें धाडधाडून कुकनें या फळांची ओझींच्या ओझी गोळा करून ठेविली. तद्देशीय लोकांनीं काहीं नजराणा केला. त्यांतील वस्तूंवरून असें दिसून आलें कीं, या लोकांची आणि कांहीं रशियन लोकाची गांठ पडलेली असावी. १।२ दिवसांत ही मंडळी आपल्या रशियन मित्रांना घेऊनच आली. त्यांतील अेकाचें नाव इस्मिलोफ असें होतें. इस्मिलोफनें त्यांना आपल्या राहुटीवर बोलाविलें आणि त्यांच्या स्वागताचीहि त्यानें चागली तरतूद ठेविली. दुसरे दिवशीं तो परत भेटीला आला. बोलण्यावरून असें दिसलें कीं, त्याला इकडल्या भूप्रष्ठाची माहिती चांगलीच आहे. रशियन लोकांनीं या भूमीवर पाय रोवण्याचे पुष्कळ प्रयत्न केले असावे. परंतु तद्देशीय लोकांनीं त्यांना हांकून दिलें कारण हे लोक फार दगलबाज आहेत असें त्यांचें मत झालें. दुसऱ्या दिवशीं इस्मिलोफ परत गेला. पण १९ तारखेला तो पुन्हां परत आला. तेव्हां कॅप्टन् कुक् यानें इंग्लंडच्या आरमार खात्याच्या प्रमुखांना एक पत्र लिहून या इस्मिलोफच्या हवालीं केलें. या उत्तरेकडील किनाऱ्याचा तयार केलेला एक नकाशाहि त्यानें या पत्राला जोडलेला होता.

याच्यामागून जेब्रक इवॅनोविच् सोपोस्लिकॉप या नांवाचा रशियन त्यांच्या भेटीला झाला आणि मग यांची व त्यांची बरीच येणीं जाणीं सुरूं झाली. फर गोळा करण्यासाठीं उनालास्का आणि कामश्चाटका यांच्यामध्यें असलेल्या बेटावर अनेक रशियन लोकांनीं आपला मुक्काम ठोकलेला असल्याचें त्यांना दिसून आलें.

ऑक्टोबर २६ ला ते या बेटांतून बाहेर पडले. कारण सॅंडविच् बेटांत जाऊन तेथें थंडीचे दिवस घालवावे असा त्यांचा बेत होता. तेथूनहि पुढें कामश्चाटकाला जावें असा त्यांचा इरादा होता. सफर सुरूं झाल्यावर त्यांना दिसून आलें कीं आग्नेयीकडून नैऋत्येकडे पसरलेल्या सॅंडविच् बेटांचा शोध आतांपर्यंत नीट लागलेलाच नाहीं या बेटावर माणसांची चांगली वस्ती होती. जिकडे तिकडे अरण्यें पसरलेलीं दिसलीं आणि पाण्याचे प्रवाहहि वहात होते. बेटावरील लोकांनीं कॅप्टन् कुक्च्या मंडळींचें मनापासून स्वागत केलें. फळें, मुळें, धान्यें इत्यादींची नवी भरती जहाजावर करणें आता प्राप्तच होतें. ती करून घेऊन १७७९ च्या जानेवारीच्या पहिल्या आठवड्यांत कुक्चें जहाज पुन्हां चालूं लागलें. या सर्व बेटांचा पूर्ण शोध लागलेला पाहून कुक्ला फार समाधान वाटलें. येथपर्यंतची सारी हकिगत कुक्नें आपल्या हातानेंच लिहून ठेविली आहे. यापुढें घडलेला प्रकार हा अत्यंत दुःखकारक असून कुक्ची आकांक्षा या ठिकाणीं अेकाअेकीं खंडित झाली. तो प्रकार आतां वर्णावयास हवा.

विल्यम् वॉटमन् हा कुक्चा गोलंदाज या बेटावरच मरण पावला आणि तेथील राजाच्या विनंतीवरून त्याचा दफनविधी तेथेंच अुरकण्यांत आला. कुक्ची मंडळी केव्हां जाणार याची चौकशी बेटावरील लोक पुन्हा पुन्हा करीत असत. याचें कारण काय? अशी शंका कांहीं कांहीं लोकांच्या मनांत येऊन गेली. तेथील लोकांचा असा समज

झाला होता कीं हे लोक अेकाद्या दुष्काळी देशांतून येथें आले असावे. आणि पोट भरण्यापलीकडे त्यांचा कांहीं हेतू नसावा. त्यांचा असा समज होणें स्वाभाविक होतें. जहाजावरील कांहीं खलाशी अतिशय रोडावून गेले होते; आणि पंगतीला बसले म्हणजे वखवखल्याप्रमाणें ते सारखे खात सुटतात हें त्यांनीं पाहिलें होतें. ते त्यांच्या पोटावर थापट्या मारून पहात आणि खुणा करून सुचवीत की येथें आल्यापासून तुम्ही बरेच जोगावलेले दिसतां पण आतां तुम्ही येथून लवकर जावें हें बरें. कुकूच्या लोकांनी त्यांना सांगितलें कीं आपण अुद्यांच निघणार आहों. त्या बरोबर राजेसाहेबांनीं सगळीकडे जाहीर केलें कीं चांगली चांगली डुकरें आणि भाजीपाला घेअून सर्वांनी लवकर यावें कारण पाहुणे मंडळी लवकरच जाणार आहेत आणि आपण त्यांचा पाहुणचार केला पाहिजे.

कॅप्टन कुक् आणि क्लार्क यांना राजानें आपल्या मकाणावर बोलाविलें. ते पाहतात तो जमिनीवर पुष्कळच बस्करें घातलेलीं होतीं, काथ्या पसरलेला होता आणि वर तांबडी पिवळीं पिसें अंथरलेली होती. पलीकडे कांहीं अंतरावर भाज्यांचे ढीग पडलेले होते आणि एक डुकरांचा कळपहि होता. या राजानें भाजीपाल्याच्या या प्रचंड ढिगांचा आणि डुकरांचा कॅप्टन् कुकला नजराणा केला. या वस्तूंची किमत इतकी मोठी होती कीं, कुकचा जीव अगदीं दडपून गेला. बेटावरील लोकांचा आग्रह पडला कीं, क्लार्कनें तेथेंच रहावें. परंतु हें शक्य नाहीं असें क्लार्कनें सांगतांच हे लोक कुककडे गेले आणि त्याला म्हणाले कीं, आपल्या मुलग्याला— क्लार्क हा कुकचा मुलगा आहे असा त्यांचा समज झाला होता— आपण आमच्यांतच ठेवून जावें. वेळ मारून नेण्यासाठीं कुकनें सांगितलें कीं, तुमचा हा लोभ पाहून मला फार आनंद होतो; पण सध्या या मुलाला दुसरीकडे फार मोठें

काम आहे. म्हणून मी त्याला घेऊन जातों. पुढल्या वर्षीं मी परत येणार आहें. तेव्हां त्याला येथें ठेवून जाईन. एकंदरीनें पाहतां बेटावरील लोकांनीं यांचें आतिथ्य फारच चांगलें केलें.

फेब्रुवारीच्या ४ तारखेला सकाळीं कुकनें जहाजें हांकारिली. थोडें पुढें गेल्यावर समुद्रावर वादळ झालें आणि जहाजें मूळ मुक्कामाला परत आलीं. पण आतां तद्देशीयांच्या वर्तनात यांना फारच फरक पडलेला दिसला. लोकांची ती आतिथ्य-बुद्धि एकाएकी नष्ट झाली. असें कां व्हावें याचें कारण कुकच्या लोकांना कळेना. राजेसाहेबहि तेथून निघून गेले होते आणि कोणी कोणी सांगू लागले कीं, त्या लोकांशीं कसें वागावें हें ठरविण्यासाठीच राजा आपल्या सरदारांना भेटावे म्हणून परत गेला आहे. परंतु लवकरच तो परत आला आणि कुकच्या लोकांच्या मनांतील संशय नाहींसा झाला. तथापि ही त्यांची चूकच होती. बेटावर कांहीं तरी शिजत



होतें. पाणी भरावयास गेलेल्या जहाजावरील लोकांचें आणि तद्देशीयांचें भाडण जुंपलें आणि क्लार्कच्या कांही खलाशांनीं गोळीबार केला. इतक्यांत

बेटावरील लोकांनी जहाजातील कांहीं माल लांबविल्याचें दिसून आलें आणि त्यांना पकडण्यासाठीं कांही खलाशी त्यांच्या मागून धावले आणि सामान परत घेऊन आले; पण त्याचे एक होडगेंहि या लोकांनीं पकडून ठेवले. होडग्याचा मालक तें परत मागूं लागला. तेव्हां त्याच्या डोक्यावर एका खलाशानें वल्ह्याचा तडाखा दिला. त्याबरोबर बेटांतील लोकांनीं खलाशावर दगडांचा वर्षाव सुरू केला. त्यांचे तें रूप पाहून कॅप्टन कुकला वाटूं लागलें कीं, आता या लोकांशीं थोडें कडक रीतीनें वागलें पाहिजे. रात्रीच्या वेळी जहाजावर पुन्हा चोऱ्या झाल्या. कॅप्टन कुकची अशी पद्धति होती की चोरीचा माल परत मिळेपर्यंत कांहीं माणसें ओलिस धरून ठेवावी. नेहमीच्या पद्धतीप्रमाणें त्याने येथली कांही माणसें धरून ठेविलीं.

हत्यारबंद होऊन आणि क्लार्कला सावध रहाण्याविषयीं सांगून कॅप्टन् कुक् या चोरट्यांच्या शोधाला गेला. त्याच्या खेडेगांवात जाऊन त्यानें राजाची गांठ घेतली. तेव्हां त्याला दिसून आलें कीं राजाला चोरीची कसलीही वार्ता नाही. यावर कुकने राजाला आग्रह केला कीं तुम्ही बोटीवर चलावें. राजा गेलाही असता; परंतु त्याची पट्टराणी कानीकापारिआ हिनें त्याला गळ घातली कीं तुम्ही बोटीवर जाऊं नये. कुकनें आग्रह करावा आणि राणीनें गयावया करून जाऊं नका असें राजाला म्हणावें असें किती वेळ तरी चाललें होतें. दरम्यान राजाचे बरेचसे लोक कुकच्या भोंवती जमा झाले. कुकचे लोक या गर्दीत पांगून उभे होते. बरोबरच्या लेफ्टनंटला कांहींतरी आदेश आला म्हणून त्यानें या सर्व लोकांना खुणावून गर्दीतून बाहेर काढलें आणि थोड्याशा लष्करी थाटानें रांगेनें उभे केलें. राजेसाहेब अगदीं खिन्न दिसत होते, आणि कॅप्टन कुक् आमच्याबरोबर चला म्हणून आग्रह करीतच होता. आतां राणीसाहेबांच्या

जोडीला राजाचे कांही सरदारही त्याला म्हणूं लागले कीं, महाराज, आपण जाऊं नये ! कुक्च्या ध्यानांत आलें कीं आपण राजाला घेऊन जाऊं लागलों तर येथें रक्तपात झाल्याशिवाय रहाणार नाही. म्हणून त्यानें तो मुद्दा सोडून दिला.

राजाला घेऊन जाण्यांत कुकचा हेतू काय होता याची नीटशी कल्पना होत नाही. पण राजाच्या लोकाना खासच असें वाटलें असलें पाहिजे कीं जहाजावरील झालेली चोरी आणि मोडतोड यासाठीं कुक् हा आपल्या राजाला कैद करून नेत असावा; पण रक्तपाताशिवाय हें होणार नाहीं हें कुकनें ओळखलें आणि आपला बेत त्यानें सोडून दिला. येथेंच हें प्रकरण संपवून या बेटांतून कुक् आणि त्याचे सारे लोक निघून गेले असते तर कांहीं निराळाच अितिहास घडून आला असता. परंतु इतक्यांत अेक चमत्कारिक प्रकार घडून आला. धरून ठेवलेल्या होडग्यांतील कांही लोक आपलीं होडगीं घेऊन निसटण्याच्या बेतांत आहेत असें खलाशांना दिसून आलें. तेव्हां त्यांनी बंदूक चालविली आणि बेटावरील लोकांच्या सरदारांपैकीं अेक सरदार मरण पावला. हें झाल्याबरोबर जिकडे तिकडे दंगल सुरू झाली आणि आपल्याला हे लोक मारणार आहेत अशी त्या बेटावरील लोकांची कल्पना झाली.

त्यांनीं आपलीं वायकापेरें दूर धाडलीं आणि अंगाभोवतीं चटया गुंडाळल्या. यांचा अुपयोग त्यांना चिलखतासारखा होत असे. त्यांनीं हातांत भाले घेतले आणि दगडांच्या राशी जमाविल्या. भाला आणि दगड हातांत घेऊन अेकजण कॅप्टन कुकच्या अंगावर आला. कुकनें त्याला दरडाविलें आणि तो अैकत नाहीं असें पाहून अेक छरा त्यानें त्याला मारला. त्या माणसाला कसलीच इजा झाली नाहीं. त्यामुळें ते लोक अेक-

दमच शेफारून अुठले, आणि कुकच्या बरोबर असलेल्या फिलिप्सवर एकानें भाला अुगारला. फिलिप्सनें आपल्या बंदुकीच्या दस्त्यानें त्याला ठोंसा दिला. दरम्यान कुकनें दुसरी गोळी भरून बंदुक झाडली आणि त्यांच्या-पैकी अेक जण पुढारी मरून पडला. मग मात्र त्या लोकांनीं दगडाचा वर्षावच सुरुं केला. आणि कुकच्या लोकांनीं बंदुकीची फैर झाडली. आश्चर्यांची गोष्ट ही कीं या फैरीनें ते लोक बिलकुल गांगरले नाहीत. अुलट बंदुकींत पुन्हां गोळ्या घालावयास यांना जो वेळ लागला तेवढयांत ते रानटी लोक आरोळ्या ठोकीत यांच्या अंगावर धावून आले. चार खलाशी मरण पावले. तिघे इतके घायाळ झाले कीं ते मरणार असें दिसूं लागले. या दंगलीतच कॅप्टन कुक पाण्याच्या काठाशीं अुभा होता. तो जवळच्या



लोकांना आणि दूर असलेल्या बोटीवरच्या लोकांना सांगत होता कीं तुम्हीं

लवकर जवळ या पण गोळ्या मात्र झाडूं नका. ही आज्ञा तो आपल्या लोकांना देत असता त्या लोकांनीं त्याच्या पाठीवर जोराचा वार केला आणि कुक् हा पाण्यांत पालथा पडला. तो पडल्याबरोबर शत्रुपक्षांत अेकच आरोळी अुठली आणि भोंवतालीं जमा होअून त्या रानटी लोकांनीं त्याचें प्रेत पाण्यांतून बाहेर ओढलें. त्यांनीं त्याचीं खांडोळीं केलीं आणि त्याचे निरानिराळे अवयव त्यांनी वाटून घेतले. या ठिकाणीं कॅप्टन् कुकची कथा अेकाअेकीच संपली. मेलेल्या लोकांची मुंडकीं, धडें, हातपाय त्या लोकांच्या सरदारांनीं आणि लोकांनीं आपापल्या योग्यतेनें वाटून घेतले. कांहीं वेळानें अेका विश्वासू माणसानें कॅप्टन कुकचे दोन हात आणि पावलें तुटून गेलेले दोन पाय हे जसेच्या तसे जहाजावरच्या लोकांना आणून दिले. हे बेटावरचे लोक नरमांसभक्षक सुद्धां असावेत अशी जहाजावरच्या लोकांची कल्पना झाली.

कॅप्टन किंग् या माणसानें पुढल्या सफरीची हकीगत लिहून ठेवलेली आहे. कुक् मेल्यावर कॅप्टन् क्लार्क याच्याकडेच सफरीचें पुढारीपण आलें. सँडविच् आयलंड्स्चा सर्व शोध यानें पुरा केला. ते पुन्हां उत्तरेकडे गेले तेव्हां त्यांना दिसून आलें कीं अमेरिकेच्या अगदीं उत्तर टोकावरचें बर्फ वितळणें अगदीं अशक्य आहे. म्हणून अमेरिकेचा उत्तर किनारा सोडून आशियाच्या उत्तर किनाऱ्यावरून एखादी वाट सांपडते कीं काय याचा शोध त्यानें चालविला. परन्तु याही कामांत यश येणार नाहीं हें पाहून क्लार्कनें खलाशांना कळविलें कीं आपण आतां घराकडे परत वळत आहोंत. कॅप्टन क्लार्क हा हळूं हळूं आजारी पडूं लागला १७७९ च्या ऑगस्टच्या २२ तारखेपर्यंत त्याचा आजार वाढत जाऊन तोही मरण पावला. तात्पर्य कुकच्या मागोमाग या सफरवाल्यांच्या मागें अपयश

धांवत येऊं लागलें. शेवटीं दक्षिणेकडे येतां येतां फेब्रुवारीच्या ५ तारखेला ते सुमात्रा बेटावर येऊन पोचले. या सफरींत सँडविच् आयलंडचा शोध लागला आणि आशिया व अमेरिका या दोन खंडाचीं टोंकें अगदीं जवळ जवळ येऊन भेटलीं आहेत हा ही अेक नवाच शोध लागला.

जहाजें इंग्लडांत परत आल्यानंतर कुकच्या मृत्यूमुळें देशांतील लोकांना किती दुःख झालें असेल याची कल्पनाच करावयास हवी. कुक मरण पावला तेव्हां तो केवळ ५१ वर्षांचाच होता. पण एवढ्या काळांत त्यानें उष्णकटिबंधापासून शीत कटिबंधापर्यंतचे सर्व समुद्र ओलांडलेले होते, शेंकडो नवी बेटें पाहिलेलीं होती, न्यूझीलंड आणि ऑस्ट्रेलिया ही विशाल भूप्रदेशें त्यानें इंग्रजांना मिळवून दिलीं होतीं. दक्षिण महासागरांत बर्फाच्या प्रचंड भिंती आड येईपर्यंत सर्व संकटांतून त्यानें सफर केली होती, आणि बेहरिंगच्या सामुद्रधूनींतून उत्तर ध्रुवाच्या सामुद्रधुनींत प्रवेश होणें हें तर त्याला केवल बर्फामुळेंच असाध्य झालें होतें. परमेश्वरानें निर्माण केलेल्या पण माणसांना अजून माहित न झालेल्या सृष्टीची शोभा पहात आणि परमेश्वराच्या कृतीचें कृतज्ञ मनानें कौतुक करीत, सप्तसागरावर कित्येक वर्षे फिरत राहून, कोठेंतरी अचानक बळी गेलेला हा कॅप्टन् कुक् आजवर होऊन गेलेल्या सर्व दर्यावर्दी संशोधकांचा राजाच म्हटला पाहिजे.

कॅप्टन् कुक्चें कुटुंब म्हणजे तो स्वतः, त्याची बायको आणि तीन मुलगे एवढेंच होतें. त्याचा स्वतःचा अंत कसा झाला हें आपण पाहिलेंच आहे. बाकीची माणसेंही अशींच दुर्दैवी ठरलीं. मोठा मुलगा एका वादळांत सांपडून मरण पावला. त्याचें शव जों परत आणतात तों सगळ्यांत धाकटा भाऊ तापानें आधींच मरण पावलेला होता. दुसरा भाऊ थंडरर नांवाच्या

जहाजावर कुक्च्या मागून सहा महिन्यांनी मरण पावला. नवरा आणि तिघे मुलगे मेलेले पाहून कुक् बाईची प्रकृति एकदमच ढासळली आणि तीही लवकरच मरण पावली. अशा प्रकारें या कुक् घराण्याचा अंत झाला. केंब्रिज येथें कुक्चें स्मारक आहे. त्यावर पुढील लेख खोदला आहे. " इंग्लंडच्या रॉयल नेव्हीवरील कॅप्टन जेम्स कुक् याचें हें स्मारक आहे. सध्यां असलेल्या आणि मागें होऊन गेलेल्या महान् कीर्तिवंत नाविकातीलच हा एक होता. पॅसिफिक महासागरांत १७७९ च्या फेब्रुवारी ता. १४ या दिवशीं औही या बेटावरील लोकांनी त्याचा वध केला. या वेळी त्याला ५१ वें वर्ष होतें. "

---

प्रकाशक— ग. ल. ठोकळ, बी. ए., बी. टी.
श्री लेखन वाचन भांडार, लक्ष्मी रोड, पुणें २.
मुद्रक—मा. ध. गुर्जर आयुर्विद्या मुद्रणालय, २६१/२ सदाशिव, पुणें २